॥ श्रीरामसमर्थ ॥

# मुमुक्षूचे उद्गार.

अर्थात्

## मुमुक्षूंतील निवडक निबंध.

हप्ता २ रा.

नमो ब्रह्मण्यदेवाय गोब्राह्मणहिताय च ।
जगद्धिताय कृष्णाय गोविंदाय नमोनमः ॥ १ ॥

---

संपादक व प्रकाशक.

लक्ष्मण रामचंद्र पांगारकर बी. ए.

मुमुक्षुकर्ते. पुणें, शनिवार ४७४.

---

मुद्रक.

हरि रघुनाथ भागवत बी. ए.

पुणें, 'वंदे मातरम्' प्रेस.

---

आषाढी एकादशी शके १८३१

जुलई १९०९

---

किंमत ४ आणे.

॥ श्रीराम ॥

# उपोद्घात.

आमच्या 'मुमुक्षु' ह्या साप्ताहिक वर्तमानपत्राचा जन्म माघ वद्य ४ शके १८२८ (ता. १ फेब्रुवारी १९०७) रोजीं झाला असून मुमुक्षूला २॥ वर्षे होत आलीं आहेत. मुमुक्षूंतील निवडक लेखांचा पहिला हप्ता गुदस्ता निराळा पुस्तक रूपानें काढलेला होता, त्याचप्रमाणें हा दुसरा हप्ता आज आह्मीं आपल्या वाचकांस सादर करीत आहोंत. गेल्या सालीं 'रामदासीबोवा' 'टिळकांचें अल्पचरित्र आणि उर्फि' ह्या लेखमाला स्वतंत्र पुस्तकरूपानें निघाल्याच आहेत. पहिल्या हप्त्याप्रमाणें यांतही धार्मिक, सामाजिक व वाङ्मयात्मक अशा निवडक लेखांचाच संग्रह केला आहे. सनातन धर्मतत्वांचा महाराष्ट्रांत प्रसार करण्याची मुमुक्षूची उमेद आहे आमच्या राष्ट्रावरील दैवी व मानुषी संकटें आह्मीं स्वधर्माची कास धरल्यावांचून दूर होणार नाहींत अशी भावना राष्ट्रांत उत्पन्न झाली पाहिजे. आमच्या राजकीय चळवळी, आमच्या सामाजिक व धार्मिक खटपटी, आमचे वाङ्मयात्मक उद्योग हे सारे धर्माच्या अनुरोधानेंच चालले पाहिजेत. धर्म हा आमच्या राष्ट्राचा प्राण आहे. गेल्या शतकांत आमचीं आपलेपणाची भावना नष्ट झाली होती ती धर्मानुरोधानें पुन्हां राष्ट्राच्या अंगांत सेलूं लागली पाहिजे. पाश्चात्यांच्या कल्पनांना आमच्या राष्ट्रीय कल्पनांवर कुरघुडी करूं देतां उपयोगी नाहीं. त्यांचे गुण घेण्यास हरकत नाहीं, पण सर्व व्यापारांत स्वत्व कायम राखिलें पाहिजे. राष्ट्रीय पक्षाच्या राजकीय तत्वांचा मुमुक्षूला अभिमान आहे, पण त्या पक्षानेंही स्वधर्माची उपेक्षा, हेळणा किंवा धिक्कार केल्यास त्या तत्वांची सिद्धी होणार नाहीं; यास्तव मुमुक्षूनें धर्मविचारांचा प्रवाह महाराष्ट्रीय चळवळींत जोरानें सोडून देण्याचा निश्चय केला आहे. आमचें पत्र, आमचीं पुस्तकें व आमचीं व्याख्यानपुराणें यांचें

हें धोरण अगदीं निश्चित झालें आहे. हें धोरण ज्यांना मान्य असेल किंवा मान्य करून घेण्याची खरी इच्छा असेल त्यांनीं पुढील निबंध मन-नपूर्वक वाचावेत. ' देव, संत आणि नाम ' ह्या तीन शद्बांत आमच्या धर्माची जादू आहे. भक्ति, ज्ञान व उपासना ह्यांच्या साह्यानें, चातुर्वर्ण्य सांभाळून, सर्व भारतीयांनीं ही जादु ओळखून राष्ट्राजागृति करावी म्हणजे अभ्युदय आणि निश्रेयस म्हणजे राष्ट्रीय आणि पारमार्थिक मोक्ष संपादन करून घेण्याचा निश्चित मार्ग त्यांस सांपडेल.

---

# विषयांची अनुक्रमणिका

# मुमुक्षूचे उद्गार

हप्ता दुसरा.

## १ मंगलाचरण.

[ रथोद्धता. ]

श्रीहरिप्रभुपदांसि वंदन । प्रेमयुक्त करि रामनंदन ॥
सत्सभा हरिपदांसि वानिते । व्हावया त्रिविधतापहानितें ॥ १ ॥
जीं पदें हृदयिं नित्य चिंतुनी । हा भवार्णवहि लंघिती मुनी ।
जीं महोग्रतर दुःख वारितीं । या भवार्णवभया निवारितीं २
हा भवार्णव फिरूनि भागलों । त्वत्पदीं विफलयत्न लागलों ॥
बावरे बहुत चित्त, नावरे । नांव रे तवचि येथ नाव रे ॥ ३ ॥
'नाम मात्र भवि तारितें' असें । संत बोलति, अविश्वसूं कसें ? ।
संत बाप, गुरु संत माउली । याविना दुजि नसेचि साउली॥४॥
संत गायचि 'मुमुक्षु'-वासरा । याविना मज दुजा न आसरा ।
'संतसंग-मुखिं नाम-हो तुझा' । या वरें हरि ! पुरीव हेतुला ५

आर्या.

वळवा दयाघना ! हो अमृताची दृष्टि या 'मुमुक्षु' कडे ॥
तुकडे शिळेहि चारा परि घ्याहो द्रवुनि बाळकासि कडे ॥६॥

पुंडलीक वरदे हरिविठ्ठल.

# २ मराठीची अधिष्ठात्री देवता.

### लेखांक १

१ गेल्या आठवड्यांत ता. ३० व ३१ मे ह्मणजे शनिवार व रविवार ह्या दोन दिवशीं आमच्या पुण्यें शहरीं बहुतेक महाराष्ट्र ग्रंथकार, लेखक व रसिक जमले होते. यंदाचें ग्रंथकारांचें हें चवथें संमेलन उत्तम रीतीनें पार पडलें याबद्दल आह्मांस संतोष वाटतो. रा. ब. गणेश व्यंकटेश जोशी, रा. ब. चिंतामणराव वैद्य, ह. प. भिंगारकर बोवा, 'भारद्वाज' नांवानें प्रसिद्ध असलेले नारचे भारदे, इतिहाससंशोधक राजवाडे, 'महाराष्ट्र महोदयाचा पूर्वरंग' हें सुंदर पुस्तक तयार करणारे नारायणराव गद्रे, प्रसिद्ध नाटककार व केसरीचे दुय्यम संपादक रा. खाडिलकर, बडोद्याचे डॉ. चिपळोणकर, आकोल्याचे रा. ब. महाजनी, सोलापूरचे 'सुप्रजानिर्माणशास्त्र' कर्ते डॉ. रानडे, नागपूरचे रा. अठेकर, स्वतंत्रप्रज्ञाशाली रा. माधवराव मोडक व त्यांचे बंधु 'माधवानुज,' रसज्ञ व कवि लक्ष्मणशास्त्री लेले, इत्यादि विद्वान् सदर संमेलनासाठीं जमलेले होते. संमेलनाच्या बैठका विजयानंद नाटकगृहाच्या विस्तीर्ण जागेंत भरल्यामुळें सभांस श्रोतृसमुदायही भरपूर जमत असे. लग्नकार्यांसाठीं किंवा करमणुकीसाठीं मे महिन्यांत पुण्यास राहवयास आलेले महाराष्ट्रांतले सर्व ठिकाणचे लोकही सदर संमेलनांत एकवटलेले होते. सर्वत्र उत्साह, स्वदेशप्रीति व स्वभाषाप्रीति या सद्विकारांचा विकास झालेला होता. 'काव्यशास्त्रविनोदेन कालो गच्छति धीमताम्' या कविवचनाची श्रोतृवृंदास पदोपदीं आठवण होत होती. दोन दिवस काव्यशास्त्राची सारखी चर्चा चालली होती.

२ प्रथम रा. वासुदेवराव आपटे यांनीं सेक्रेटरी या नात्यानें स्वागतपर भाषण केलें, व रा. ब. वैद्य यांची अध्यक्षस्थानीं योजना झाली. त्यांचें माहितीनें

व विदुत्तेनें भरलेलें चांगलें भाषण झालें. कुमारी रा. लक्ष्मणशास्त्री लेले यांनीं 'मराठी क्रमिक पुस्तकें' या विषयावर उत्कृष्ट निबंध वाचला व त्यावर डॉ. चिपळोणकर व रा. गद्रे यांनीं चर्चा केली. इंग्रजी राज्यापासून गेल्या ७५ वर्षांतल्या क्रमिक पुस्तकांची माहिती देऊन नवीन झालेल्या सरकारी सातही पुस्तकांवर लेल्यांनीं मार्मिक टीका केली, व ह्या पुस्तकांतील शेंपन्नास दोषस्थळें दाखवून पुस्तकें अगदीं टाकाऊ झालीं आहेत, हें त्यांनीं श्रोत्यांच्या मनावर ठसविलें. केसरी, इंदुप्रकाश व मुमुक्षु ह्या पत्रांत क्रमिक पुस्तकांवर झालेल्या चर्चेंतले उतारे देऊन लेले यांनीं सदर पुस्तकांचें धोरण स्वदेशाभिमान उत्पन्न करण्याचें नसून त्यांत फाजील राजनिष्ठेचें पुराण जागोजाग कसें वाचलें गेलें आहे हेंही सांगितलें. यानंतर मिरजेचे डे. ए. इन्स्पेक्टर रा. गोगटे यांनीं मोडी लिपीवरील विवेचनात्मक निबंध श्रोत्यांस समजावून दिला. मोडी लिपी अधिक झपाट्यानें लिहितां येत असल्यामुळें बाळबोधींतूनच ती कशी निघाली, आपली वर्णमाला कशी सशास्त्र आहे, मोडी लिपी सर्वमान्य होण्यास काय काय सुधारणा करावयास पाहिजेत, इत्यादि विषयांचें रा. गोगटे यांनीं सुंदर विवेचन केलें. दुसऱ्या दिवशीं सकाळीं रा. गं. ना. सहस्रबुद्धे यांनीं 'मराठींतील शास्त्रीय वाङ्मय' यावर निबंध वाचला. आपल्याकडे शास्त्रीय विषयांची अभिरुचि कमी असल्यामुळें मराठी भाषेंत गेल्या शंभर वर्षांत झालेलीं लहानमोठीं १०० च शास्त्रीय पुस्तकें झालीं आहेत, झालेलीं बहुतेक भाषांतररूप आहेत, हें सांगून स्वतंत्र पुस्तकें कशीं होतील याचें त्यांनीं विवेचन केलें. त्यानंतर ठाण्याचे रा. भावे यांनीं सरकार आम्हांला खरें शास्त्रीय शिक्षण कसें देत नाहीं हें सांगून सद्यःस्थिति शास्त्रीय शोधांना उत्तेजक नाहीं असें सांगितलें, व नंतर सुप्रसिद्ध राजवाडे बोलावयास उठले.

३ राजवाड्यांनीं तीन छोटेखानी निबंध वाचले. . मुक्तेश्वरानंतर झालेल्या चंद्रात्मज कवीचें उद्योगपर्व सांपडल्याचें सांगून त्यानें नमनांत ज्ञानेश्वरएक-नाथांप्रमाणें मुक्तेश्वरासही नमन केलें आहे, व 'आतां पांचवें उद्योगपर्व । कथारूपें अति अपूर्व' असें म्हटलें आहे; यावरून मुक्तेश्वराच्या ४ पर्वांनंतर

पांचव्या पर्वापासून चंद्रात्मजानें आरंभ केला आहे व मुक्तेश्वराचें पूर्ण भारत सांपडणें अशक्य आहे, असा आपला सिद्धांत त्यांनीं सांगितला. हा सिद्धांत आमच्या मतें धाडसाचा आहे. पांचव्या पर्वापासून चंद्रात्मजानें जर मुक्तेश्वरी भारतास आरंभ केला, तर मुक्तेश्वरांचें सौप्तिकपर्व कां सांपडावें, व चंद्रात्मजाचीं पुढील तरी सर्व पर्वें कां सांपडूं नयेत ! थोड्या पुराव्यावर सिद्धांत बांधीत सुटणें योग्य नाहीं. मुक्तेश्वरी भारताचीं बाकीचीं पर्वें सांपडण्याचा अद्याप संभव आहे. निदान मुक्तेश्वरानें चारच पर्वें लिहिलीं असा सिद्धांत करणें चुकीचें आहे असें आह्मांस वाटतें. राजवाड्यांनीं नंतर स्टेन कोनौ यांनीं 'ल' चा 'ळ' व द्वित्त 'ल्ल' चा 'ळ' कसा होतो याबद्दल दिलेला नियम सर्वस्वी खरा कसा मानतां येत नाहीं याबद्दल अपवादात्मक उदाहरणें दिलीं, पूर्वेतिहासाचें महत्व हृदय द्रवण्यासारख्या स्फूर्तिदायक वाणीनें वर्णिलें, व इतिहाससंशोधनाच्या कामीं द्रव्यसाह्य करा म्हणून श्रोत्यांची प्रार्थना केली. रा. ब. वैद्य, जोशी व महाजनी अशासारख्या वयोवृद्ध व विद्वान् लोकांची 'गुलामगिरींत वाढलेले' 'नीच' 'अव्यय' इत्यादि पदव्यांनीं राजवाड्यांनीं जी संभावना केली तिचा मात्र निषेध केल्याशिवाय आमच्यानें राहवत नाहीं. तुम्हांस स्वतंत्रतेची कितीही आवड असली तरी वृद्धांचा उपमर्द करणें अयोग्य व विक्षिप्तपणाचें आहे. सभेंत सभ्यांचा आणि सभापतीचा उपमर्द करण्याची रीत निषेधार्ह आहे व राष्ट्रीय शीलाला हानिकारक आहे असें आह्मांस वाटतें. राजवाड्यांचा शोधकपणा, स्वार्थत्याग, उद्योगप्रीति आणि इतिहासभक्ति हे गुण अत्यंत श्लाघ्य आहेत, व म्हणूनच सभेनें त्यांच्या विक्षिप्तपणाचें कौतुक केलें असें दिसतें !

४. रविवारीं दुपारीं रा. पांगारकरांचें 'ज्ञानेश्वरीचा जीर्णोद्धार' या विषयावर व्याख्यान झालें. शेवटीं गणपतराव जोशी यांनीं ग्रंथकारांना फार कळकळीचा उपदेश केला, व सभेचें काम संपलें. सभेच्या प्रारंभीचें रा. ब. वैद्यांचें व शेवटचें रा. ब. जोशी यांचें अशीं दोन्हीं व्याख्यानें फार उत्तम झालीं. तीं माहितीनें व कळ-

कळकळीनें भरलेली असून वक्त्यांच्या विद्वत्तेला, वयाला व अनुभवाला साजेशीच झाली. महाराष्ट्राच्या भूगोलासंबंधानें बोलतांना अध्यक्ष म्हणाले, "महाभारताच्या भीष्मपर्वाच्या ९ व्या अध्यायांत हिंदुस्थानांतील लोकांची जी यादी दिली आहे, त्यांत पांडुराष्ट्र, अश्मकोपराष्ट्र वगैरे महाराष्ट्रीयांच्या पूर्वजांचा उल्लेख सांपडतो. दाक्षिणात्य व विदर्भ हे एकच होत. अपरांत व कोंकण यांचा भारतांत उल्लेख असून यांची गणना महाराष्ट्रांत होत असे. महाराष्ट्राची ही व्याप्ति ख्रिस्ती-सनापूर्वी निश्चित झाली होती. वराहमिहिराच्या ग्रंथांत 'महाराष्ट्र' हें नांव प्रथम सांपडतें. इसवी सनाच्या पांचव्या शतकांत मराठी भाषेस हल्लींचें रूप येऊन मराठी वाङ्मयास नवव्या शतकांत सुरुवात झाली असावी." ग्रंथकारांना उपदेश करितांना रा. ब. जोशी म्हणाले—"मुत्सद्दी व योद्धे यांच्याइतकीच ग्रंथकारांचीही गरज राष्ट्राला असते. जगाच्या प्रगतीला चलन मिळतें तें विचारांमुळें व मनोवृत्तींमुळें मिळतें. जनतेच्या मनाला, विचाराला व प्रवृत्तीला वळण लावावयाचें, व प्रोत्साहन द्यावयाचें हें काम ग्रंथकारांचेंच आहे. सध्यांची परिस्थिति भयंकर आहे. कोणत्याही देशावर आला नव्हता एवढा बिकट प्रसंग सध्यां आपल्या देशावर आला आहे; म्हणून राष्ट्रीय विचारांचें बीजारोपण होणें अवश्य आहे, व तें काम ग्रंथकारांनीं करावें. आपला पूर्वेतिहास उत्साहजनक आहे. ग्रंथकार व द्रव्य यांचें साहचर्य असावयास पाहिजे. स्वावलंबन शिका म्हणजे तुमच्या हातून चांगलीं कार्यें होतील." यंदाच्या संमेलनाचें काम याप्रमाणें संपलें.

५. संमेलनाचें काम झालें; पण अध्यक्षांनीं आपल्या भाषणांत जो एक महत्वाचा पण वादग्रस्त मुद्दा सांगितला तिकडे आमच्या वाचकांचें लक्ष वेधणें आमचें कर्तव्य आहे असें आम्ही समजतों. चिंतामणराव वैद्य म्हणाले:— "आचार्यांनंतर धर्मजागृतीकरितां विद्वान् लोकांनीं मराठी भाषेच्या द्वारें यत्न केल्यानें महाराष्ट्र वाङ्मयाचा आरंभ झाला, व याच जोरावर ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम, मुक्तेश्वर, रामदास, मोरोपंत, श्रीधर,

महिपति, इत्यादिकांनीं ग्रंथरचना केली. महाराष्ट्राचें स्वातंत्र्य गेलें. धर्मजागृति-ही राहिली नाहीं. अलीकडे स्वदेश व स्वराज्य यांच्या कल्पनांनीं महाराष्ट्राच्या प्रतिभेस पुन्हा स्फूर्ति मिळाली आहे. जुन्या वाङ्मयमंदिराची अधिष्ठात्री देवता भगवद्भक्ति होती; नव्या वाङ्मयमंदिरांतील अधिष्ठात्री देवता स्वदेशाभक्ति ही आहे. या मंदिराचा पाया विष्णुशास्त्री चिपळोणकर यांनीं घातला आहे."
रा. ब. वैद्य यांचीं हीं वाक्यें महत्वाचीं आहेत. यांचें म्हणणें असें आहे कीं, मराठी ग्रंथकारांना गेल्या पांचसहाशें वर्षांत धर्मश्रद्धेमुळें प्रेरणा मिळाली, व अलीकडे मराठी ग्रंथकारांना स्वदेशप्रीतीमुळें प्रेरणा मिळत आहे. ज्ञानेश्वर हे मागच्या काळांतले अग्रेसर होत व एकनाथ, तुकाराम, रामदासादि संत त्यांचे अनुयायी होत. विष्णुशास्त्री हे सांप्रतच्या काळांतले अग्रेसर होत, व सध्यां असलेले व पुढें होणारे ग्रंथकार हे त्यांचे अनुयायी होत. वैद्यांच्या भाषणाचाच अनुवाद रा. ब. जोशी व केसरीकार यांनीं केला आहे. रा. ब जोशी म्हणतातः—
"अध्यक्षांनीं सांगितल्याप्रमाणें मन्वंतर झाल्याकारणानें वस्तुदेवता, व स्थलदेवता बदलली आहे. स्वदेशप्रीति व स्वातंत्र्यप्रीति ही अधिष्ठात्री देवता झाली आहे. नवीन जागृतीला व स्फुर्तीला अनुलक्षून वाङ्मयाची वाढ झाली पाहिजे, असें अध्यक्षांनीं सांगितलेंच आहे." सदर प्रश्नासंबंधानें केसरीकारांनीं आपलें मत दिलें आहे तें असें—"विचारांचें अंतिम साध्य कोणतें, व त्या साध्याकडे लोकांनीं कसें जावें, हें बिनचूक दाखविण्याचें काम ग्रंथकारांकडे असल्यामुळें परिस्थितीला अनुसरून लेखनकलेच्या अधिष्ठात्री देवतेचें स्वरूप बदलत असतें. वेदांत व भगवद्भक्ति ही पूर्वीच्या महाराष्ट्रांतील ग्रंथकारांची अधिष्ठात्री देवता होती व स्वाभिमान व स्वदेशप्रीति ही सांप्रतच्या लेखकांची प्रतिभा चेतविणारी देवता आहे. परिस्थितीला अनुरूप अधिष्ठात्री देवतेचें स्वरूप बदलणें इष्ट असतें."

रा. ब. वैद्य, रा. ब. जोशी व केसरीकार या तिघांनींही एकाच तत्वाचें प्रतिपादन केलें आहे. [illegible] राजवाडे यांनीं मराठ्यांच्या इतिहा-

साचीं साधनें शोधून काढण्यास प्रारंभ केला व इतक्या अवधींत त्यांनीं बरींच साधनें प्रसिद्धही केलीं आहेत. पण या अवधींत त्यांनीं एक खूळ पिकविलें आहे व दुर्दैवानें त्यांना या बाबतींत महाराष्ट्रांतील कित्येक तरुण अनुयायी मिळाले आहेत. वेदांतानें आमच्या देशाचा नाश केला; ज्ञानेश्वरानें महाराष्ट्राला बुडविलें; ज्ञानेश्वर, तुकाराम, एकनाथ, इत्यादिकांनीं आपल्या खुळ्या उपदेशांनीं आमचें राष्ट्र पंगू बनविलें; साधुसंतांचा देशाला कांहीं उपयोग नाहीं; ते राष्ट्रकार्याला निरुपयोगी आहेत; महिपतीनें आपल्या संतचरित्रांत मनःकल्पित भाकडकथा संचून भरल्या आहेत; इत्यादि मतांचें प्रतिपादन राजवाड्यांनीं गेल्या दहा वर्षांत अनेक ठिकाणीं केलें आहे. वारकऱ्यांना 'टाळकुटे' व संतांना 'संतांडें' म्हणून त्यांनीं आपला तिरस्कारही व्यक्त केला आहे. वारकरी संत व रामदास यांच्यांत भेद माजवून वारकरी संत हे पंगु, दुबळे, निरर्थक, टाकाऊ, व देशोन्नतीला मार्ग ओढणारे आहेत असें म्हटलें आहे. हीं राजवाड्यांचीं भयंकर मतें कांहीं तरुणांच्या अंगांत भिनत चाललीं आहेत. 'जसे लोक तसे देव' हा 'काळा-'तला निबंध कित्येकांस आठवत असेलच. महाराष्ट्रांतले लोक दुधखुळे बनल्या-मुळें गुलामांना शोभण्यासारखी 'कटेवरी कर ठेवणाऱ्या विठोबाची' उपास्यदेवता त्यांनीं आपल्यापुढें ठेवली व दामाजीपंतांच्या चरित्रांत विठोबाला बादशहाच्या छातीवर न बसवितां त्यांनीं 'विठ्यामहार' बनविलें अशा अर्थाची ती टीका होती! मालाकार—आमचे मित्र भोपटकर—यांनीं 'देशभक्त व भगवद्भक्त' या विषयावर एक विचित्र लेख लिहून देशभक्ताची पायरी देवभक्ताच्या फार वरची असते; देशभक्ताचा आनंद ब्रह्मानंदापेक्षां शतपटीनें ज्यास्त आहे; ब्रह्मानंदाचा वीट येईल, व तो नकोसा वाटेल किंवा अपुरा भासेल; पण देशभक्त्यानंदाचा वीट येणार नाहीं; साधुसंत व भगवद्भक्त हे नुसते उपदेशक होते, देशाला मोक्षपदाला न नेण्यांत त्यांचा अप्पलपोटेपणा किंवा दौर्बल्य होतें; इत्यादि विलक्षण कल्पना प्रकट केल्या आहेत! अशा प्रकारच्या विचारांचा परिणाम म्हणूनच कीं काय कोण जाणे 'बुद्धिमंतांच्या पोरांनी' [illegible]

व आर्यराष्ट्राला स्वप्नांतरीही माहीत नसलेली दुष्ट वस्तु मिटक्या मार-
मारून खाणारे लोकही महाराष्ट्रांत सांपडूं लागले, व 'मतिविकारा' सारख्या
समाजाची पायमल्ली करणाऱ्या नाटकाला मोठमोठ्या शहरांतून प्रेक्षकवृंदही
मिळूं लागले आहेत ! शिष्य गुरूवरही ताण करीत असतात, या न्यायानें राज-
वाड्यांचे तरुण भक्त म्हणजे त्यांच्या वरील मतांचे अनुयायी हे देव, धर्म व
संत इत्यादिकांची विविधप्रकारें चेष्टाही करूं लागले आहेत ! हे सर्व लोक राष्ट्रीय-
पक्षांतले असल्यामुळें त्यांची राजकीय मतें आम्हांला मान्य आहेत व त्यांच्यापैकीं
कित्येकांचा आमचा दृढपरिचय व स्नेहही आहे हें कळविणें जरूर आहे. पंचवीस
वर्षांपूर्वी सामाजिक सुधारक जसे समाजाला छळीत असत, तसे हे अलीकडचे
राष्ट्रीय पक्षांतले कांहीं लोक धर्माला छळीत आहेत ! पूर्वींच्या कित्येक सामाजिक
सुधारकांत गोपाळराव देशमुख, माधवराव रानडे, वामनराव मोडक, पाळंदे यांसा-
रखे सुधारक धर्माला व पूर्वपरंपरेला जितका मान देत, तितकाही राष्ट्रीय पक्षांतले
हे लोक त्याला मान देत नाहींत !! मागील परंपरेची ओळख बुजूं पाहत आहे.
असो. राजवाडे आणि त्यांचे अनुयायी गेल्या पांचशें वर्षांतल्या संतांना व
कवींना पंगु व निरर्थक ठरवूं पाहत आहेत. एवढें
धाडस रा. ब. वैद्य, जोशी व केसरीकार यांनीं केलें
नाहीं. त्यांनीं पूर्वग्रंथकारांनीं धर्मजागृतीच्या द्वारें आपलें काम केलें; पण
आज तो काळ संपल्यामुळें देशजागृतीच्या द्वारें अर्वाचीन ग्रंथकार राष्ट्रजा-
गृतीचें कार्य करीत आहेत, असा मध्यम व सौम्य मार्ग काढला आहे. समंजस व
अनुभवी लोक अशाच युक्तीनें बोलत असतात. पूर्व मराठी ग्रंथकारांना राष्ट्र-
भक्तीची व स्वदेशप्रीतीची ओळख नव्हती, वेदांत व भगवद्भक्ति एवढेंच ते पेलत
बसले; पण आज आम्ही स्वाभिमान व स्वदेशप्रीति यांचा जयजयकार करीत
व यांच्या स्फूर्तीनें ग्रंथरचना करीत आहोंत, असा बहुतेक अर्वाचीन ग्रंथकारांचा,
लेखकांचा व रसिकांचा आशय दिसतो, व त्याचाच उद्गार रा. ब. वैद्य यांच्या
मुखांतून निघाला; आणि रा. ब. वैद्य व केसरीकार यांच्यासारख्या तज्ज्ञ व

लोकमान्य सज्जनांनीं त्याला पाठिंबाही दिला. हा विषय अत्यंत महत्वाचा आहे व याचें महत्व केवळ ग्रंथकारांपुरतें नसून आमच्या सर्व चळवळींचें स्वरूप त्यामुळें व्यक्त होत आहे. हें नवीन मत आहे. ज्ञानेश्वरादि प्राचीन ग्रंथकारांना स्वदेशभक्ति माहीत होती का नाहीं, स्वदेश-भक्तीचें स्वरूप काय, अर्वाचीन ग्रंथकारांना भगवद्भक्तीचें निशाण दूर झुगारून द्यावेसें कां वाटलें, भगवद्भक्ति व स्वदेशभक्ति यांच्यांत विरोध आहे कीं काय, तात्पर्य, जुन्या वाङ्मयमंदिराची अधिष्ठात्री देवता भगवद्भक्ति होती व नव्याची अधिष्ठात्री देवता स्वदेशभक्ति आहे या सिद्धांतापासून निष्कर्ष काय निघतो, इत्यादि मुद्यांचा विचार करणें अवश्य आहे. ज्यांचीं नांवें आम्ही वर उच्चारिलीं आहेत ते सद्गृहस्थ किंवा त्यांच्या मताचे इतर सज्जन यांच्याविषयीं पूर्ण स्नेह व आदर मनांत बाळगूनच या विषयावर आम्हीं आपले विचार स्पष्टपणें प्रगट करणार आहोंत. विचार व्यक्तीचा नाहीं, तत्वाचा आहे. भगवद्भक्ति व स्वदेशप्रीति यांची सांगड आमच्या राष्ट्रानें घालून ठेवली आहे, व दोहोंचा विरोध माजवून पूर्वपरंपरा विच्छिन्न करणें राष्ट्रहिताला अपायकारक आहे असें आमचें ठाम मत आहे; व म्हणून आम्हांस गुरुस्थानीं असलेल्या पूज्य व्यक्तींच्या मतांवरही टीका करण्यास आम्ही प्रवृत्त झालों आहों.

—वर्ष २ अंक १८

---

## लेखांक. २

७. रा. ब. वैद्य यांनीं मराठी ग्रंथकारांच्या संमेलनांत "जुन्या वाङ्मयमंदिराची अधिष्ठात्री देवता भगवद्भक्ति होती व नव्या वाङ्मयमंदिराची अधिष्ठात्री देवता स्वदेशभक्ति आहे' असा जो पूर्वपक्ष केला त्याची मांडणी आम्हीं मागील लेखांत केली होती. रा. ब. वैद्य यांच्या मताला रा. ब. जोशी व केसरीकार यांनीं जोर दिल्यामुळें व तें मत बहुतेक ग्रंथकार, लेखक व देशभक्त यांना पसंत असल्यामुळें हा पूर्वपक्ष मोठा प्रबळ आहे हें उघड आहे. मराठी

वाङ्मयमंदिरांत " देव, भक्त, आणि नाम। यांचा त्रिवेणीसंगम " झाला असून नवीनांना देव–धर्म–संतांचा मार्ग नको आहे ! राजवाड्यांसारखे लेखक त्या मार्गानें जाऊन आम्ही खड्ड्यांत पडलों असें उघड प्रतिपादितात ! रा. ब. वैद्य, जोशी व केसरीकार यांच्यासारखे अधिक समंजस लोक जुन्यांना नांवें न ठेवतां आपली अधिष्ठात्री देवताच निराळी आहे असें सांगतात ! नवी-नांतही नरम–गरम असा थोडा मतभेद आहेच. एक गोष्ट निर्विवाद आहे कीं, गेल्या पन्नास वर्षांतील लेखकांनीं व देशभक्तांनीं भगवद्भक्तीला गौणत्व आणलें आहे. इंग्रजी विद्येच्या प्रसाराबरोबर जुन्या आचारविचारांची ओळख बुजाल्यामुळें देवधर्मसंतांविषयीं कोठें उघड अनादर व कोठें आदराचा अभाव याप्रमाणें विरुद्ध भावना उत्पन्न झाल्या आहेत. राष्ट्रीय सभा असो, प्रांतिक सभा असो, जिल्हा सभा असो, संमेलन असो, सामाजिक परिषद् असो, शिवाजी-उत्सव असो, नाहीं तर गणेशोत्सव असो–कोणत्याही चळवळी असोत–मग त्या मवा-ळांच्या असोत वा जहालांच्या असोत; सुधारकांच्या असोत वा उद्धारकांच्या असोत; कोणाच्याही कोणत्याही चळवळींत ' भगवंताचें अधिष्ठान ' नाहीं ! आमच्या सर्व चळवळींची सर्व काळची अधिष्ठात्री देवता एकच आहे. भगवंता-वांचून दुसरी अधिष्ठात्री देवता आमच्या राष्ट्राला माहीत नाहीं. भगवंतावांचून वेदांचें प्रतिपाद्य दुसरें नाहीं. भगवंतावांचून उपनिषदांनीं कोणाला गायिलें नाहीं. भगवंताशिवाय आमचे प्रवृत्तिपर ग्रंथही दुसरी देवता मानीत नाहींत. रामायण महाभारतांचेंच नव्हे, तर इतर शास्त्रांचेंही प्रतिपाद्य एकच आहे. पाणिनीसारखा वैय्याकरणी किंवा भास्कराचार्यांसारखा ज्योतिषी सुद्धां आपलें अंतिम व्यास-वाल्मीकिशुकांप्रमाणेंच निःश्रेयसावाप्ति हेंच आहे असेंच सांगतात. श्रीकृष्णासारख्या राजकारणी महापुरुषाच्या अवताराचें अंतिम तरी ' धर्मसंस्था-पनार्थाय संभवामि युगे युगे ' हेंच आहे. शिवाजी महाराजांच्या चळवळींचेंही अंतिम साक्षात् त्यांच्या मुखांतून आलेल्या उद्गाराप्रमाणें ' हिंदुधर्मरक्षणासाठीं आम्हीं फकीरी घेतली आहे ' हेंच आहे ! ' देव–धर्म आणि नाम ' ही हिंदु-

राष्ट्राची सोपानपरंपरा आहे. ही ज्ञानेश्वरादिकांपासूनच आली आहे असें नाहीं; तर वेदकालापासूनच हिंदुराष्ट्राचें अंतिम हेंच आहे. आमची अधिष्ठात्री देवता म्हणजे भागवतच आहे. प्रत्येक काळाला अधिष्ठात्री देवता निरनिराळी करूं लागाल तर प्रत्येक काळांत जुनें राष्ट्र मोडून त्याच्या जागीं नवें राष्ट्र आणून बसविल्यासारखें होईल! आम्ही आपली परंपरा व्यासवाल्मीकांपर्यंत व जनकदशरथापर्यंत भिडवितों व आमचें राष्ट्र दहा हजार वर्षांचें आहे असें अभिमानानें सांगतों, याचें कारण आमचें एक विशिष्टत्व कायम आहे. आमच्या राष्ट्राचें त्रिकालअबाधित अंतिम एकच आहे. तें आमच्या डोळ्यांपुढून कधींही ढळतां उपयोगी नाहीं. बुद्धधर्मानुयायांची व मुसलमानांची प्रचंड लाट आम्हां वेदधर्मीयांवरून गेली, तशीच सांप्रतचीही ख्रिस्त्यांचीही लाट जाईल. प्रत्येक लाटेचा अवरोध करण्याची ताकद आम्हांत आहे. आम्ही आपलें अधिष्ठान, आपलें अंतिम, आपला खुंटा मात्र बळकट धरला पाहिजे. तो आमच्या हातचा सुटला, कीं आम्ही वाहवलोंच म्हणून समजावें. अनुभवानंतर व विचारानंतरः—

आलोड्य सर्व शास्त्राणि विचार्यैव पुनः पुनः ॥
इदमेकं सुनिष्पन्नं ध्येयो नारायणः सदा ॥ १ ॥

असा निष्कर्ष आमच्या पूर्वजांनीं काढला आहे. पूर्वजांचे विविध ग्रंथ पंचवटीच्या रानांत विचारपूर्वक वाचून ते प्रत्ययास आणणाऱ्या समर्थांनींही, 'ग्रंथ पाहतां लक्ष कोटी। जेथें तेथें भक्ति मोठी' असेंच म्हटलें आहे. महिम्नस्तोत्रकारांनीं—

रुचीनां वैचित्र्यादृजुकुटिल—नानापथजुषाम् ।
नृणामेको गम्यस्त्वमसि पयसामर्णव इव ॥ १ ॥

असा अत्यंत व्यापक सिद्धांत काढला आहे. ज्ञानेश्वरमहाराजांनींही श्रद्धा-[illegible] ओंजळीनें आपलीं पद्यसुमनें परमेश्वराच्याच पायावर वाहिलीं आहेत. ते प्रेमभरानें म्हणतातः—

भरोनि सद्भावाची अंजुळी । मियां वोविया फुलें मोकळीं ॥
अर्पिलीं अंघ्रियुगुळीं । विश्वरूपाच्या ॥ १ ॥

सद्गुरूला परमात्मभावानें पूजणाऱ्या शिवरायानें आपल्या कष्टार्जित राज्याच्या सनदा समर्थांच्या झोळींत घातल्या व समर्थांनीं त्या परत शिवरायाला देऊन हें परमेश्वराचें राज्य परमेश्वराचा मुनीम या नात्यानें आपलें मन ' भगवें ' म्हणजे न्यस्तसंकल्प करून चालीव असें सांगितलें. या एकाच गोष्टीवरून या गुरुशिष्यांच्या जोडीचें अंतिम काय होतें याची चांगली कल्पना येईल. आमच्या राष्ट्राचें अधिष्ठान भगवत्प्राप्ति हेंच होय. प्राचीन काळीं हेंच अधिष्ठान होतें व अर्वाचीन काळींही हेंच कायम राहिलें पाहिजे.

८. तर मग असा प्रश्न निघतो कीं, ' नव्या वाङ्मयमंदिराची अधिष्ठात्री देवता स्वदेशभक्ति आहे ' या रा. य. वैद्यांच्या वाक्याचा अर्थ काय? नव्या वाङ्मयमंदिराचा पाया घालणारे पहिले पुरुष म्हणजे विष्णुशास्त्री चिपळोणकर हे होत, असें वैद्यांनीं सांगितलें आहे. तेव्हां हें मंदिर केवळ ३०।४० वर्षांचें आहे, असें उघड होतें. निबंधमालेनें लोकांच्या विचारांची दिशा फिरविली व स्वाभिमानाची मशाल महाराष्ट्रांत पेटविली ही गोष्ट खरी आहे. ' जहाल पक्षाचा पहिला वीर ' विष्णुशास्त्रीच होय ही गोष्ट निर्विवाद आहे. अलीकडील बहुत लेखकांना प्रेरणा शास्त्रीबुवांच्या तेजस्वी लेखांपासून मिळाली आहे, व शास्त्रीबुवांनीं मोठेंच राष्ट्रकार्य केलें आहे, या गोष्टी कोणासही नाकबूल करतां यावयाच्या नाहींत. त्यांनीं जो एक जोरदार विचार महाराष्ट्रांत उत्पन्न केला त्याच्याच नादांत आमचे सर्व लोक तल्लीन होऊन गेले आहेत; पण मागें पाहण्याची मात्र कोणासही बुद्धि होत नाहीं. विष्णुशास्त्री व त्यांचे लेख यांविषयीं आह्मांस पूर्ण अभिमान वाटतो; पण कृष्णशास्त्री चिपळूणकरांसारख्या नास्तिकशिरोमणीच्या पोटीं जन्म मिळाल्यामुळें व बाळपणांत भगवद्भक्तीचे शुद्ध संस्कार उत्पन्न होण्यासारखी परिस्थिति व पुण्याई नसल्यामुळें विष्णु-

ब्राह्मणांच्या शिक्षणांत एक व्यंग राहिलें. अलीकडे जुनी परंपरा मोडल्यामुळें व धर्मशिक्षण घरींही मिळत नाहीं व शाळेंतही मिळत नाहीं, अशी स्थिति झाल्यामुळें लोकांत ' भावार्थाचा दुष्काळ ' पडला आहे. भगवद्भक्तीचें शिक्षण घरीं नाहीं, दारीं नाहीं; परमार्थाची ओळख आचारांत नाहीं, विचारांत नाहीं; धर्माचें स्वरूप काय आहे याची कल्पना नाहीं; संतांना पाहण्यासारखी चोखाळ दृष्टि राहिली नाहीं; स्नानसंध्या, पूजा, श्राद्धपक्ष, जपतप, इत्यादि सत्कर्मांचें वळण राहिलें नाहीं; यामुळें आमचे लोक पूर्ण नास्तिक बनले नसले तरी अश्रद्ध व आचारविचारहीन झाले आहेत ! ' जना सुबुद्धि नावडे । मन धांवे पापाकडे ' अशी स्थिति आहे. पाश्चात्यांच्या संसर्गदोषामुळें भगवद्भक्तीचें वळण सुटलें आहे. स्वदेशभक्तीचें तरी वळण विष्णुशास्त्री व टिळक या राष्ट्रभक्तांच्या दृढ परिश्रमामुळें टिकलें आहे, हें एकप्रकारें आमचें सुदैवच आहे. पाश्चात्य लोक पूर्ण रजोगुणी आहेत. त्यांची विद्या राजस आहे. त्यांच्या संसर्गास्तव आम्हीही राजस बनत आहोंत. अशी खरी स्थिति आहे. त्यांचे गुण तेवढे आम्हीं घेतले पाहिजेत; पण त्यांची ' आसुरी संपत्ति ' आम्हांस नको. दैवी संपत्ति ही आमची परंपरागत इस्टेट आहे. हीस आम्हीं केव्हांही मुकणें उपयोगी नाहीं. आसुरी संपत्ति मोह पाडून जाळ्यांत अडकविणारी आहे. तीपासून आम्हीं अलिप्त राहिलें पाहिजे. देशकालवर्तमान पाहून ' उचित आणि अवसरें करूनि प्राप्त ' झालेलें कर्तव्य करायची तयारी पाहिजे आहे; पण आपल्या राष्ट्रांतील सर्व चळवळींचें धोरण जी ' धर्मसंस्थापनेची कीर्ति ' ती संपादण्यासाठीं आम्हीं मुख्यत: झटलें पाहिजे. आमच्या स्वधर्माचरणांतच राष्ट्रभक्तीचा अंतर्भाव होतो. ब्राह्मणांनीं चारी वर्णांना इहपरलोक साधण्यासारखा सद्बोध करणें, क्षत्रियांनीं प्रजापालन करणें, वैश्यांनीं व्यापार व शेतकी यांची उन्नति करून राष्ट्राची संपत्ति वाढविणें, व शूद्रांनीं वरील तीनही वर्णांची सेवा करणें—सर्वांनीं सर्व कर्में निरहंकारबुद्धीनें भगवत्प्रीत्यर्थ करणें—हा आमचा राष्ट्रीय धर्म आहे, ही आमची स्वदेशभक्ति आहे, ही बुद्धि आमच्या राष्ट्राची

' अधिष्ठात्री देवता ' आहे. आमच्या हरएक चळवळींची नौका अतिमानावर दृष्टि देऊन आम्हीं हाकारली पाहिजे. इंग्रजी शाल्यापासून आमची पूर्वपरंपरा तुटल्यासारखी झाली आहे, हीच महदापत्ति होय.

९. इंग्रजी राज्य आणि इंग्रजी विद्या यांच्यायोगानें आमचे सुशिक्षित लोक आमच्या खऱ्या राष्ट्रीयत्वाला पारखे झाले आहेत. आमच्या इकडे शाळा, कॉलेजें वगैरे स्थापन करण्याचा सरकारचा हेतुच आह्मांला आमच्या पूर्वपरंपरे-पासून तोडण्याचा होता. सुप्रसिद्ध मेकालेसाहेब इ. स. १८३५ च्या आपल्या Minute on Education मध्यें ह्मणतात:—

" We must do at present our best to form a class who may be interpreters, between us and the millions we govern, a class of Persons Indian in blood and colour, but English in taste, in opinions, in morals and in intellect ! " याचा अर्थ असा आहे. " ज्या लक्षावधि लोकांवर आह्मांला राज्य करावयाचें आहे त्यांच्यामध्यें मध्यस्थाचें काम करणारा—ह्मणजे त्यांचे विचार आह्मांला सांगणारा व आमच्या विचारांचा त्यांच्यामध्यें फैलाव करणारा–असा एक ( सुशिक्षितांचा ) वर्ग आह्मांला हरप्रयत्नानें निर्माण करावयाचा आहे ! हे लोक रक्तानें व रंगानें हिंदीच असले पाहिजेत, मात्र त्यांच्या अभिरुचि, त्यांचीं मतें, त्यांची नीतिमत्ता, व त्यांची बुद्धि ही सर्वस्वी इंग्रजी वळणार गेली पाहिजे ! ! " हिंदुस्थानांत इंग्रजी विद्येचा फैलाव कर-णाऱ्या मुख्य पुरुषाचे हे हेतु किती अंशानें सिद्धीस गेले आहेत हें आज शेंकडों उदाहरणें देऊन सहज सिद्ध करितां येणार आहे ! खुद्द मेकॉले साहेब नीं १८३६ च्या आक्टोबर महिन्यांत आपल्या बापास एक खाजगी पत्र लिहिलें. त्यांत त्यांनीं लिहिलें होतें कीं, " Our English schools are flourishing wonderfully......The effect of English education on Hindus is prodigious. No Hindu, who has reecived an

English Education, ever remains sincely attached to his religion. Some contime to profess it as a matter of policy,......" याचें तात्पर्य असें आहे कीं, " आम्हीं स्थापन केलेल्या इंग्रजी शाळा जोरानें चालल्या आहेत. इंग्रजी शिक्षणाचा हिंदूंच्या मनावर विलक्षण परिणाम झाला आहे. ज्याला इंग्रजी शिक्षण मिळतें अशा कोणत्याही हिंदूची आपल्या धर्मावर अंतःकरणपूर्वक श्रद्धा राहत नाहीं ! लोकांचें मन दुखवूं नये, म्हणून वरपांगी कांहीं लोक धार्मिकपणाचा आव घालतात इतकेंच ! " मेकॉलेसाहेबांनीं याच पत्रांत पुढें उमेदीनें लिहिलें आहे कीं, " इंग्रजी विद्येचा हिंदुस्थानांत पूर्ण फैलाव झाल्यास ३० वर्षांच्या अवधींत सुशिक्षितांत एकही मनुष्य मूर्तिपूजक राहणार नाहीं, व धर्मस्वातंत्र्यांत हात घातल्याशिवाय हें काम गुपचपपणानें आम्हांस करितां येणार आहे ! असें होण्याचा काळ लवकरच येत आहे, ह्या कल्पनेनेंच मला आनंदाच्या गुदगुल्या होत आहेत. " संस्कृत व प्राकृत भाषांच्या ऐवजीं इंग्रजी भाषा हिंदुस्थानांत सुरू करण्याच्या कारणांत मेकॉलेसाहेबांनीं असेंही एक कारण दिलें होतें कीं, " आमच्या भाषेंतील ग्रंथांशीं तुलना करण्याच्या किमतीचा–कोणत्याही विषयावरचा–एकही ग्रंथ संस्कृत ( आणि आरबीही ) भाषेंत नाहीं ! संस्कृत ग्रंथांची योग्यता ते ज्यावर लिहिले जातात त्या कागदाच्या किंमतीइतकीही नाहीं ! " इ० इ०

१० मेकॉलेसाहेबांप्रमाणेंच पुष्कळ इंग्रजांचें मत आहे. आमच्या इंग्रजी विद्येच्या प्रभावानें हिंदु लोक आचारविचारांत हिंदुत्वापेक्षां आंग्लत्व जास्त वाळगतात. ( They become more English than Hindus ) असें इ० स० १८३८ मध्यें सर चार्लस ट्रॅव्हेलियन् यांनीं म्हटलें आहे. इंग्रजी विद्येच्या प्रभावानें हिंदु लोकांची आपल्या धर्मावर, आपल्या रीतीभातींवर, आपल्या सामाजिक संस्थांवर अश्रद्धा उत्पन्न व्हावी हा जसा मेकॉलेप्रभृतींचा उद्देश होता, तसाच इंग्रजी भाषेमुळें हिंदुस्थानांतल्या भाषाही नामशेष होऊन सर्व हिंदुस्थान

इंग्रजीमय व्हावें अशीही त्यांची इच्छा होती. प्रो. वुइल्सन इ० सन १८२६ मध्यें एका मासिक पुस्तकांत लिहितात—"हिंदुस्थानांतील प्राचीन व अर्वाचीन सर्व हिंदी भाषांचा नायनाट होऊन त्यांची जागा सर्व प्रकारें इंग्रजीनें पटकवावी ह्मणून कांहींचे जारीनें प्रयत्न चालले आहेत" इ. इ. इंग्रजांची शास्त्रें, इंग्रजांच्या नीतीच्या कल्पना, इंग्रजांचा धर्म, इंग्रजांच्या भाषा, इंग्रजांच्या रीतिभाती यांचा हिंदुस्थानभर फैलाव होऊन लोकांचें स्वधर्म, स्वभाषा, स्वराज्य इत्यादिकांवरचें प्रेम उडून तें मनःपूर्वक कट्टे 'इंग्रजभक्त' बनावेत, असा इंग्रजी मुत्सद्यांनीं ८० वर्षांमागें डाव टाकला व त्या कामीं त्यांस पुष्कळ यश आलें, हें प्रत्यक्षावरून कबूल करणें भाग आहे. इ. सन १८५३ मध्यें सरचार्लस ट्रेव्हेलियन ह्मणाले आहेतः—"बायबल ग्रंथ आह्मी सरकारी शाळांतून शिकवीत नाहीं हें खरें; पण बायबल हा ग्रंथ भेटच्या व इतर टीकांसह आह्मी सर्व शाळांना जोडून असलेल्या वाचनालयांतून ठेवीत असतों! मिशनऱ्यांच्या प्रयत्नानें जितके लोक ख्रिस्ती होतात, तितकेच हिंदु लोक कॉलेज व इतर सरकारी शाळा यांच्यांतून बाहेर पडलेल्या सुशिक्षितांतून होतात असा प्रत्यक्ष अनुभव आहे!" त्याच सालीं सर फ्रेडरिक हॅलिडेन, बंगालचे पुढें लेफ्टेनंट झालेले सिव्हिलियन—ह्मणाले कीं, "सरकारी क्रमिक पुस्तकांत आम्हीं बायबल घातलें नाहीं; पण त्याचा समावेश शाळांच्या पुस्तकालयांतून केला असून दरोबस्त विद्यार्थ्यांना तें वाचतां येतें." शिवाय सर ट्रेव्हेलियन यांनीं ह्मटल्याप्रमाणें "सुप्रसिद्ध इंग्रज ग्रंथकारांच्या द्वारानें ख्रिस्ती धर्मतत्वांच्या उपदेशाचा केवढा परिणाम हिंदी विद्यार्थ्यांच्या मनावर झाला आहे, याचा आह्मांलाही अंदाज करवत नाहीं! त्यामुळें बायबल वाचणें विद्यार्थ्यांना भाग पडतें. मला वाटतें कीं, इंग्लंडांतील कोणत्याही शाळेपेक्षां कलकत्त्याच्या हिंदु कॉलेजमध्यें बायबलाच्या तत्वांचें खरें ज्ञान अधिक झालेलें आहे!" सर वुइलियम हंटर हे इ. स. १८७२ सालीं हिंदुस्थानसरकारच्या स्टॅटिस्टिकसूकडील डायरेक्टर जनरल होते.

ते म्हणतात, “कोणताही तरुण विद्यार्थी—मग तो हिंदू असो वा मुसलमान असो–इंग्रजी शाळेंतून इंग्रजी विद्याप्रवीण होऊन बाहेर पडला कीं, तो परंपरागत वाडवडिलांच्या धर्माविषयीं पूर्ण अश्रद्ध होऊनच बाहेर पडतो! ” गेल्या ५०।७५ वर्षांत इंग्रजी शिक्षण आमच्या राष्ट्रास जें दिलें जात होतें, तें कोणत्या हेतूनें दिलें जात होतें हें समजण्यास एवढे उतारे बस्स आहेत. हिंदु लोकांचा आपल्या धर्मावर, आपल्या चालीरीतींवर, आपल्या संस्थांवर, आपल्या पूर्वपरंपरेवर अविश्वास उत्पन्न होऊन त्यांच्या शीलांत ढिलेपणा–ज्याला Tolerance असें गोंडस इंग्रजी नांव देण्याची वहिवाट पडली आहे—यावा अशा तऱ्हेनें इंग्रजी विद्येचा फैलाव हिंदुस्थानांत करण्यांत आला. असें करण्यांत मुख्य उद्देश हा दिसतो कीं, हिंदी लोकांनीं आपल्या मानेवर इंग्रजी अंमलाचें जूं शतकानुशतकें सामिमान वाहावें, व त्यांचा कडवेपणा, निष्कपटपणा, स्वाभिमान, स्वातंत्र्यप्रीति व मर्दपणा हे सहज गुण लयास जाऊन, इंग्रजी साम्राज्याचे त्यांनीं अहोरात्र पोवाडे गात गुलामगिरीचे शिळे व उष्टे तुकडे निरंतर खात पडावें!

११. इ० सन १८२५ मध्यें मुंबई शहरांत जी पहिली इंग्रजी शाळा सरकारनें काढली, तिच्यांत विद्याभ्यास करून नांवालौकिकास चढलेल्या एका प्रख्यात पुरुषाचें ( दादोबा पांडुरंग यांचें ) आत्मचरित्र आह्मांस सांपडलें आहे. प्रथम आपल्या लोकांनाही सरकारच्या हेतूविषयीं किंतु वाटत होता, असें त्यांतील पुढील उद्गारांवरून वाचकांच्या लक्षांत येईल. तो गृहस्थ ह्मणतोः—“ एकदोन वर्षेपर्यंत मुंबईस लोक अशी कल्पना आपल्या मनांत करूं लागले कीं, आमचे मुलांस शिकविण्याचें सरकारास इतकें काय अगत्य आहे! तेव्हां या धूर्त इंग्रजी सरकारचा यांत कांहींतरी मतलब असावा. आमच्या मुलांस हुशार करून त्यांस पुढें बाटवावें असा सर्वांचा तर्क धांवत होता ह्मणून ते आपलीं मुलें या मोठ्या शाळेंत पाठविण्यांत मोठा संशय घेत असत!”

इंग्रजीपूर्वी लोकांत जो दूरदर्शीपणा होता तो जाऊन इंग्रजी झाल्याबरोबर लोक सरकारचे केवळ भाट बनून राहिले, हें गोपाळराव देशमुखांच्या लोकहितवादी-वरून पुष्कळांस कळणार आहे.

१२. सरकारच्या हेतुप्रमाणें इंग्रजी विद्येच्या मादिरापानानें आमच्या लोकांची स्वधर्मादिकांवरील श्रद्धा ढासळून ते स्वधर्म, स्वराज्य, स्वदेशांतील चालीरीति, इत्यादिकांचा तिरस्कार, उपहास व द्वेषही करूं लागले. स्वधर्मतिरस्कृतीमुळें प्रार्थनासमाज, आर्यसमाज, ब्राह्मोसमाज, वगैरे समाज उत्पन्न झाले, व सर्वचजण स्वजनतिरस्कृतीच्या पिशाचानें घेरले जाऊन अद्वातद्वा बरळूं लागले. जातिभेद, ब्राम्हणद्वेष, पुनर्विवाह, बालविवाह, इत्यादि विषय चर्चेसाठीं लोकांपुढें घेऊन जुना समाज व नवा समाज याप्रमाणें समाजाच्या फुटीस प्रारंभ झाला. चाळीसवर्षेंपर्यंत सुधारणेचा काळ होता. सुधारकांनी या काळांत जुन्या समाजास लाथा मारण्याचें कर्म मोठ्या उल्हासानें केलें. पण आघातप्रत्याघाताच्या नियमाप्रमाणें या सुधारकांना लाथा मारून जुनेरणाच्या कैवारानें विष्णुशास्त्रीबोवांनीं स्वदेशप्रीतीची मशाल पेटविली, तेव्हांपासून महाराष्ट्रांत सुधारकचमू निर्वीर्य होऊन बसली. शास्त्रीबोवांना स्वदेशभक्तीची प्रेरणा झाली व त्यांनीं समाजाचें तोंड पश्चिमेकडून पूर्वेकडे वळविलें. शास्त्रीबोवांनीं निःसंशय मोठें राष्ट्रकार्य केलें; पण त्यांनाही स्वधर्मश्रद्धेचें बाळकडू मिळालें नव्हतें. त्यांचे वडील म्हणजे केवळ नास्तिकशिरोमणी होते. कृष्णशास्त्र्यांची विद्वत्ता व रसिकता विष्णुशास्त्र्यांत उतरली; शिवाय इंग्रजी वाङ्मय व मुख्यतः इतिहासवाङ्मय, स्वदेशी वाङ्मयाबरोबरच शास्त्रीबोवांनीं वाचल्यामुळें इतिहासवाचनामुळें त्यांच्या ठिकाणीं स्वदेशप्रीति उत्पन्न झाली, तिला कर्तव्याची जोड मिळाल्यामुळें न्यूस्कूल, केसरी, चित्रशाळा वगैरे संस्था व आगरकर, नामजोशी, टिळक वगैरे होतकरू तरुण त्यांनीं हातीं धरिलें. शास्त्रीबोवा अकालीं वारल्यामुळें आमच्या देशाची भयंकर हानि झाली आहे. शास्त्रीबोवांचें काम टिळकांनीं २५ वर्षें उत्तम प्रकारें केलें आहे

व गेल्या दोन वर्षांत सर्व हिंदुस्थानची जागृति होऊन लालबालपालादि देश-वीरांच्या साह्यानें स्वदेशभक्तीची प्रचंड लाट हिंदुस्थानभर पसरली आहे. बावीस वर्षांच्या कांग्रेसच्या कामामुळें, पोटाला चिमटा बसूं लागल्यामुळें, इंग्रजी अंमलाची कर्झन–मिंटो–मोर्ले–प्रभृति सुलतानांच्या बिनधोरणी वर्तनानें ओळख पटूं लागल्यामुळें, व मुख्यतः सर्व जगभर सर्व देशांत एकदम पेटलेल्या स्वराष्ट्रनिष्ठेच्या वणव्यामुळें, भरतखंडरूपी कुंभकर्ण पूर्ण जागा झाला आहे. 'स्वदेशभक्ति हा आमचा धर्म, आणि स्वदेश हा आमचा देव ' ह्या बिपिनचंद्रानें म्हटलेल्या मंत्राचा घरोघर जयघोष होऊं लागला आहे व स्वदेशोन्नतीसाठीं घरा-दारांचा व सर्वस्वाचा यज्ञ करण्याची बुद्धि तरुणपिढींत उत्पन्न होत आहे ! हा सर्व प्रकार अत्यंत उत्साहदायक आहे. आम्हांला ह्या नव्या कायदेशीर जागृतीविषयीं अत्यंत प्रेम वाटत आहे. राष्ट्रांत नवीन जोम उत्पन्न होत आहे, तथापि गेल्या ५०।७५ वर्षांत स्वधर्मश्रद्धेचा जोर कमी झाला आहे हें चांगलें नसून आमच्या चळवळीला भगवंताच्या अधिष्ठानाचा व स्वधर्माचरणरूप तपाचा भक्कम पाया मिळाल्याशिवाय त्या कायमच्या फलद्रूप होण्याचा संभव नाहीं, असा आमचा ठाम सिद्धांत आहे. शास्त्रीबोवांनीं सुधारणाबाईच्या तोंडांत भिरकावल्यापासून ती कांहीं काल निचेष्ट पडली होती; पण सध्यां जिकडे पहावें तिकडे तिच्यावर फिदा झालेले लोक राष्ट्रीय पक्षाच्याही कंपून पुष्कळ आढळून येत आहेत ! आमच्या मतें ही स्थिति चांगली नाहीं. सुधारणाप्रीति आणि धर्मश्रद्धेचा अभाव हे दोन दोष राष्ट्रीय पक्षांतही आढळून येत आहेत. बंगालच्या लोकांनीं गीतेचा जयजयकार चाल-विला आहे, व महाराष्ट्रांत टिळकांनीं वेदग्रंथ, महाभारत, व गीता ह्यांच्या प्रकाशांत आपलें वर्तन ठेवलें आहे, ह्या गोष्टी आशादायक आहेत; तथापि सामान्यतः राष्ट्रीय पक्षांतल्या लोकांतही सुधारकांप्रमाणें सामाजिक आणि धार्मिक बाबतींविषयीं उपहास, तिरस्कार किंवा निदान औदासिन्य वसत आहे. ही खरी गोष्ट लपविण्यांत अर्थ नाहीं. राष्ट्रीय पक्षाच्या चळवळींना धर्मश्र-

द्वेचा पाया मिळालाच पाहिजे, त्या केवळ प्रपंचेकदृष्टीनें चालवून उपयोग नाहीं, ह्या मुद्यावर कायतो आमचा कटाक्ष अहे. गेल्या तीस चाळीस वर्षांत स्वदेशप्रीतीची ओळख लोकांस होत आहे; पण भगवद्भक्तीची ओळख धर्मश्रद्धेच्या अभावामुळें बुजत आहे. शास्त्रीबोवांच्या वेळेपासून आजपर्यंत चाललेल्या चळवळींना भगवद्भक्तीचा पाठिंबा मिळालेला नाहीं, स्वदेशभक्तांना भगवंताची ओळख करून घेण्याची बुद्धिही झाली नाहीं, ह्मणून अधिष्ठानावरून भगवद्भक्तीला खालीं ओढून त्या ठिकाणीं स्वदेशभक्तीची ते स्थापना करूं पाहत आहेत ! वस्तुतः स्वदेशभक्तीचा अंतर्भाव आमच्या धर्माचरणांतच होतो. स्वदेशभक्ति ही राष्ट्रप्रपंचाला अवश्य अशी प्रपंचसृष्टींतली अत्युदात्त भावना आहे. सात्विक स्वदेशभक्तीचा अंतर्भाव वर्णाश्रमपद्धतीच्या धर्माचरणांत होतो हें आमच्या धर्माचें मनन करणाराच्या लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं.

—वर्ष २ अंक २०

## लेखांक ३.

विद्यामृत बहु साहेब देती । स्वस्थ बसूं तें पीत !! ॥ १ ॥

शालापत्रक १८६२ मे.

१३. हिंदुस्थानांत इंग्रज सरकारानें ७५।८० वर्षांपूर्वी विद्याखातें सुरू करून शाळा, कॉलेजें वगैरेंची गर्दी उसळून दिली, ती कोणत्या उद्देशानें दिली, हें मागील लेखांत लॉर्ड मेकॉले, सर चार्लस ट्रॅव्हेलियन, सर फ्रेडरिक हॅलिडन, व सर वु. हंटर यांच्या लेखांतील उताऱ्यांवरून आह्मीं स्पष्ट करून दाखविलेंच आहे. इंग्रज लोक पहिल्यापासूनच आमच्याशीं फार धूर्तपणानें वागलें आहेत. त्यांच्या कोणत्याही कृत्याच्या मुळाशीं काय हेतु असतो हें ३०।४० वर्षांनंतर अभ्यास करूं लागतें ! आपल्या हातांत सांपडलेला हिंदुस्थान काय-

मचा आपल्या पंजाखालीं कसा ठेवतां येईल या मुख्य विचाराच्या सुकाणूप्रमाणें ते सर्वांशीं सर्वकाळ वागत असतात. आपल्या हिताला कसें जपावें ही गोष्ट इंग्रजांपासून जगानें शिकून घ्यावी! इंग्रज कोणतेंही काम केवळ परार्थबुद्धीनें करणार नाहींत व स्वहिताला पळभर विसरणार नाहींत अशी आमची समजूत आहे. इंग्रजांनीं आमच्या देशांत गांवोगांव शाळा घातल्या, कॉलेजें सुरू केलीं, मोठाल्या पगारावर हेडमास्तरपासून डायरेक्टरपर्यंत चांगले लोक नेमून शाळाखात्याचें जाळें सर्व देशभर टाकलें, प्राकृत भाषांत नानाप्रकारच्या विषयांवर ग्रंथ करण्यास उत्तेजन दिलें व लेखनवाचनकलेचें संरोपण केलें—हें सर्व त्यांनीं केवळ आमच्याच कल्याणासाठीं केलें अशी आमची आजपर्यंत समजूत होती! इंग्रजांनीं सुरू केलेल्या विद्याविषयक संस्थांपासून आमचें बिलकूल कल्याण झालें नाहीं. आमचें म्हणणें इतकेंच आहे कीं, आम्हांला आमच्या पूर्वपरंपरेपासून व सऱ्या राष्ट्रीयत्वापासून तोडून टाकण्याच्या उद्देशानें त्यांनीं विद्यादान देण्यास सुरुवात केली. मिळविलेलें राज्य चिरंतन पचवावें कसें या एका हेतूनें प्रेरित होऊन इंग्रजसरकारनें सर्व खातीं उत्पन्न केलीं आहेत. विद्याखातें सर्वांत सोंवळें व पवित्र खातें; पण तें सुद्धां राजकीय दृष्टीनें त्यांनीं अस्तित्वांत आणलें आहे व राजकीय धोरणावरच तें चालविण्याचा त्यांचा संकल्प आहे! आमच्या इलाख्यांत जाइल्स व सेल्बी या डायरेक्टरांच्या कारकीर्दींत शिक्षणखातें हें राजकीय खात्याच्या तंत्रानें कसें चालविण्यांत आलें याचा लोकांस प्रथमच अनुभव आला. येथील लोकांच्या विचारांचा जो स्वाभाविक ओघ पडला होता त्याची दिशा बदलून तो आपणांस अनुकूल करून घेतला पाहिजे, अशी कल्पना त्यांच्यांतील मुत्सद्यांच्या डोक्यांत प्रथम आली, आणि लागलीच शाळाखात्याची स्थापना करण्यांत आली! संपादित राज्य टिकविण्याकरितां तटबंदी करणें जरूर होतें, व म्हणून त्यांनीं शाळाखात्याची योजना करून लोकांच्या विचारांचा प्रवाह पार बदलून टाकण्याचा

दूरदर्शीपणा केला. तरुणांचीं मनें आपल्या ताब्यांत घेऊन त्यांच्या चळवळींचा ओघ फिरविण्यासाठीं सरकारनें शाळाखातें काढलें व त्यामुळें त्यांच्या साम्राज्याची बळकटी वाढली असली तरी आमचें राष्ट्र अधिक विस्कळित व दुर्बळ झालें व आपला धर्म व पूर्वपरंपरा यांस विसरून गेलें एवढाच आमचा मुख्य मुद्दा आहे.

१४. सर चार्लस ट्रेव्हेलियन यांनीं आपल्या 'एज्युकेशन' या पुस्तकांत (१८३८) स्पष्ट म्हटलें आहे:– "मीं हिंदुस्थानांतल्या निरनिराळ्या भागांत कित्येक वर्षें काढलीं आहेत, व मला असें आढळून आलें आहे कीं, आमचें राज्य नुकेंच स्थापित झाल्यामुळें व लोकांच्या विचारांचा प्रवाह बदलून टाकण्याचा प्रयत्न न झाल्यामुळें लोकांच्या राष्ट्रीय तऱ्हा पूर्वीसारख्या कायम राहिल्या आहेत. (The national habits of thinking remained unchanged.) सरदार आणि सामान्य लोक, श्रीमंत आणि गरीब, या सर्वांना आपली राजकीय उन्नति घडवून आणण्याचा पूर्वीं एकच मार्ग दिसत होता! स्वराज्य पुन्हां स्थापन झाल्यास आपल्यास पूर्वीचें ऐश्वर्य भोगण्यास सांपडेल असें वरच्या लोकांस वाटत होतें, व संपत्ति आणि द्रव्य मिळविण्याचे मार्ग आपणांस मोकळे होतील असें खालच्या लोकांस वाटत होतें. इंग्रजांना हिंदुस्थानांतून एकदम हाकून देण्याशिवाय आपली दु:स्थिति बदलण्यास दुसरा उपाय नाहीं असें समंजस व सामान्यत: सुस्थित अशा लोकांसही वाटत होतें! यानंतर मी कांहीं वर्षें बंगाल्यांत राहिलों आणि येथें जाऊन पाहूं लागलों तों कांहीं नवीनच विचारांचा उद्गम सुशिक्षित हिंदी लोकांत झाला आहे असें मला आढळून आलें. (and there I found quite a new set of ideas prevalent among the educated natives!) ज्यूरीमध्यें किंवा माजिस्ट्रेटच्या बेंचवर साहेबांच्या बरोबर आपल्याला बसण्याचा मान कसा मिळेल या चिंतेंत ते बिचारे चूर झालेले मला आढळले! पंजाब आणि नेपाळ येथील राजकारणांची चर्चा करण्याच्याऐवजी

छापण्याची कला आणि वाद्विवादांचें स्वातंत्र्य यांपासून काय फायदे होतात या विषयांवर वाद्विवादक सभांतून वक्तृत्वपूर्ण अशा इंग्रजी भाषेंतून व्याख्यानें देण्यांत ते दंग होऊन गेले आहेत असें मला दिसून आलें !! " आम्ही सर ट्रॅव्हेलियन यांच्या इंग्रजी वाक्यांचें अक्षरशः मराठी भाषांतर वर दिलें आहे. त्याचा सर्व देशहितेच्छूंनीं नित्य विचार करावा. राष्ट्रीय शिक्षणाच्या राष्ट्रीय शाळा स्थापन करण्याची आवश्यकता कां आहे याचाही येणेंकरून जाणत्यांस चांगला उमग पडल्याशिवाय राहणार नाहीं असें आम्हांस वाटतें. वरील उताऱ्यावरून एका गोष्टीचा उत्कृष्ट निर्णय होतो. इंग्रजांनीं हिंदुस्थानांत शाळा आणि कॉलेजें स्थापन केलीं त्याचा हेतु आपल्या ' अशिक्षित ' बापआजांना ' पंजाब व नेपाळ येथील राजकीय प्रकारांच्या ' घातुक विचारांपासून सोडवावे व अधिक शांतपणाचे व ' सुधारलेले ' सन्मार्ग त्यांना लागावे ' एवढाच होता ! ' आपली राजकीय उन्नति घडवून आणण्याचा ' एकच मार्ग त्यांना ' ज्या अज्ञानामुळें दिसत होता तें अज्ञान पार झाडून टाकण्याचा सरकारानें निश्चय केला. सर ट्रॅव्हेलियन साहेबांनीं आणखी असें म्हटलें आहे कीं, 'नेटिव्हांतल्या देशाभिमानी लोकांना योग्य मार्ग दाखविणें जरूर आहे.' शाळा व कॉलेजें काढून सर्व शास्त्रें शिकविण्याचा मक्ता इंग्रजांनीं आपणांकडे जसा घेतला तसा देशाभिमान शिकवावयाचाही विषय त्यांनीं आपल्याकडेच राखून ठेवला !

१५. सर ट्रॅव्हेलियन आणखी म्हणतात–" मनुष्यस्वभावांत स्वोन्नति करून घेण्याची उत्कंठा स्वाभाविकच असते. प्रत्येक मनुष्याची व राष्ट्राची स्वोन्नतीची कांहीं विशिष्ट कल्पना असते, व ती त्या मनुष्याला किंवा राष्ट्राला कधीं स्वस्थ बसूं देत नाहीं, तर त्याच्याकडून कांहीं तरी चळवळ करवीत असते. हिंदी राष्ट्राची ही वृत्ति आपणाकडे आपण ओढली नाहीं तर ती आपल्या विरुद्ध दिशेनें काम करील, आपल्या नष्ट स्वातंत्र्याचे विचार हिंदी लोकांच्या मनांत जोंपर्यंत घोळत राहतील, तोंपर्यंत इंग्रजांना हिंदुस्थानाबाहेर

सरारास हाकून लावणें हाच स्वोन्नतीचा रामबाण उपाय त्यांच्याजवळ राहील. [ As long as the natives are left to brood over their former independence, their sole specific for improving their condition is the immediate and total expulsion of the English, ] इंग्रजीपूर्वीच्या देशभक्तांना ह्याशिवाय दुसरा उपायच माहीत नव्हता. राष्ट्राची गेलेली संपत्ति आणि इभ्रत पुन्हां परत मिळविण्यास ह्याशिवाय दुसरे कांहीं मार्ग त्यांच्या ध्यानांत कधींच आले नाहींत. ( A native patriot of the old school has no notion of any thing beyond this, his attention has never been called to any other mode of restoring the dignity and prosperity of his country. ) हिंदी लोकांच्या राष्ट्रीयत्वाच्या कल्पनांना नवी व निराळी दिशा दाखवून देणें असेल तर युरोपियनांच्या कल्पना डोक्यांत खेळत्या ठेवण्यानेंच हें शक्य आहे, अन्यथा नाहीं ! ( It is only by the infusion of Europeon ideas that a new direction can be given to the national views ! ) यापुढें सर चार्लस ट्रेव्हेलियन यांनीं म्हटलें आहे कीं, " आम्हीं काढलेल्या इंग्रजी शाळेंत शिकून तयार झालेल्या तरुणांना आपले पूर्वज ज्या जुलुमाखालीं वाढले त्या जुलमी राज्यपद्धतीचा व त्या राज्यकर्त्यांचा तिटकारा व तिरस्कार वाटतो, आणि इंग्रजांना हिंदुस्थानांतून घालवून देण्याचे विचार त्यांचे डोक्यांत खेळत नाहीत, तर इंग्रजी राजसत्तेचें छत्र डोक्यावर कायम राहून काय काय सुधारणा करितां येतील इकडे त्यांचें सर्व लक्ष गुंतून राहतें ! असें झालें म्हणजे स्वातंत्र्याची महत्वाकांक्षा व तत्संबंधीं विचार सहजच त्यांच्या डोक्यांतून पार निघून जातात. अशा विचारानें लोक तयार झाले म्हणजे एकदम राज्यक्रांति होणें अशक्यच होईल, व आमचा हिंदुस्थानाशीं जडलेला संबंध चिरकाळ टिकेल ! मराठे किंवा मुसलमान यांची जुलमी सत्ता पुन्हा

एकदां स्थापित होईल; पण युरोपियन वळणावरचें स्वराज्य मिळवायला त्यांना एक शतकही पुरणार नाहीं ! ( A Maratha or a Mahomedan despotism might be reestablished in a month, but a century would searcely suffice to prepare the people for self Government on the Europeon model ! ) हिंदी लोक आपल्याविरुद्ध उठणार नाहींत, व राष्ट्राची सर्व शक्ति पाश्चात्त्यांचें ज्ञान व पाश्चात्त्यांच्या संस्था उत्पन्न करून त्यांतच सुख मानून त्या मुरवून घेण्यांतच निरुपद्रवीपणानें खर्च होईल ! ( harmlessly employed in naturalising Europeon knowledge and Europeon Institutions ! ) आमच्या संरक्षणछत्राखालींच देशाचा उद्धार होईल, अशा समजुतीनें सुशिक्षित लोक आह्मांलाच चिकटतील—आज ते असे चिकटूं लागले आहेतच—ज्यांचे विचार इंग्रजी वळणावर गेले आहेत त्यांना आम्ही जितके आवश्यक वाटूं, तितके दुसऱ्या कोणालाही वाटणार नाहीं ! "

१५. यावरून किती तरी गोष्टींचे खुलासे होतात. आमच्या वाचकांनीं वरील उताऱ्याचें नीट मनन करावें, म्हणजे इंग्रजांच्या दूरदर्शीपणाची व धूर्ततेची त्यांना यथार्थ कल्पना येऊन, किती बुद्धिवंत व शहाण्या लोकांशीं देवानें आपली गांठ घालून दिली आहे हें त्यांस बरोबर समजेल ! पाऊणशें वर्षांपूर्वीच्या हिंदी देशभक्तांना पूर्ण स्वातंत्र्य पाहिजे होतें व आपल्या राष्ट्राची इज्जत व संपत्ति ( Dignity and properity ) परत मिळण्याचा दुसरा राजमार्ग त्यांस माहीत नव्हता ! ह्यामुळें ' राष्ट्रीय विचारांना नवें वळण ' लावण्यासाठीं व ब्रिटिश संरक्षणछत्राखालीं संतुष्ट राहून निरुपद्रवी चळवळी करणारे सुशिक्षित लोक हिंदुस्थानांतल्या लोकांच्या स्वाभाविक महत्वाकांक्षा व विचारपद्धति यापासून तोडून आपल्याला हितावह अशा मार्गावर त्यांना ओढून नेण्यासाठीं शाळा आणि कॉलेजें देशभर पसरून इंग्रजांनीं केवढ्या शिताफीनें व मुत्सद्दीपणानें चिल-

ह्मण क्रांति घडवून आणली आहे! रक्तपाताशिवाय क्रांति बहुधा घडून येत नाहीं, पण सरकारानें शिक्षणाच्या द्वारानें हिंदी लोकांत ती घडवून आणली! ब्रिटिश राज्याची स्थापना करून सरकारानें अशा प्रकारें हिंदी लोकांचे विचार व आचार यांना सर्वस्वीं उलट बाजूचें वळण लावून दिलें. मराठ्यांनीं किंवा मुसलमानांनीं एका महिन्यांत पुन्हां स्वराज्य स्थापलें असतें, अशा नाजुक प्रसंगीं 'लोकांनीं नष्ट झालेल्या स्वराज्याचा ध्यास घेऊन बसूं नये' ह्मणून त्यांच्या विचारांचा पाट फोडून आपल्या मार्गांत नेऊन आपली बागाईत इंग्रजांनीं उत्तम प्रकारें केली आहे! यांत इंग्रजांना दोष देतां येणें शक्य नाहीं. त्यांनीं स्वार्थासाठीं जो वर्तनक्रम धरिला तोच त्यांच्यासारख्या दुसऱ्या कोणत्याही धूर्त लोकांनीं धरिला असता. आमच्या लोकांना स्वदेशाभिमानाची ओळख नव्हती, आणि केवळ इंग्रजी विद्येच्या संसर्गानेंच आम्ही स्वदेशाभिमानाचा सद्गुण शिकलों, असें समजणारे अद्याप कोणी बावळे असतील तर त्यांच्या डोळ्यांत सर चार्लस ट्रेव्हेलियन यांचे हे वर नमूद केलेले उद्गार चांगले झणझणित अंजन घालतील अशी आह्मांस आशा आहे. आमची तर अशी पक्की समजूत आहे कीं, देशाभिमान आह्मी इंग्रजांपासून शिकलों नाहीं. ह्या श्रेष्ठ मनोवृत्तीला आम्ही कधींही पारखे नव्हतों! उलट इंग्रजांपासून देशाभिमानाच्या चुकीच्या आणि भ्रामक कल्पना मात्र आम्हांत पसरल्या आहेत! तुकारामासारखे संत हे राष्ट्रीय उन्नतीच्या कामीं निरुपयोगी व पंगु आहेत आणि अलीकडचे लेखक व वक्ते हे देशाभिमानाचीं पार्सलें विलायतेहून येथें आणून लोकांस मोफत वाटीत आहेत, असा जो भ्रम अलीकडे कित्येकांस झाला आहे तो अशापैकींच आहे! ज्ञानेश्वरापासून मोरोपंतापर्यंत जे मराठी संत, कवि व धर्मोपदेशक झाले त्यांना स्वदेशाभिमानाची ओळख नव्हती आणि राष्ट्रधर्म व राष्ट्रपरंपरा यांना सोडून त्यांचें वर्तन पदोपदीं होत आहे असे अर्वाचीन लेखक 'स्वदेशाभिमाना'ची जागृति करीत आहेत ह्माही भ्रम अशापैकींच आहे! आपलेपणा ज्यांचे आचारविचारांत मूर्तिमंत वास करीत होता त्यांना स्वदेशाभिमानाची ओळख नव्हती

आणि संध्येचीं चार आचमनें टाकायचीं किंवा ईशस्तवन करण्याची ज्यांना वाराबारा वर्षांत आठवण होत नाहीं, किंवा ईश्वरापुढें घटका दोन घटका बसून राष्ट्रीय संतांचीं वचनें संतोषपूर्वक वाचण्याइतका ज्यांच्यांत 'भक्तीचा जिव्हाळा' नाहीं, असे स्वाचारशून्य लोक मात्र देशाभिमानाचे पुतळे असा भ्रम इंग्रजी विद्येमुळेंच आमच्या राष्ट्रांत उत्पन्न झाला आहे. वरील वृत्तान्ताचा राजकीय दृष्ट्या आम्हीं विचार करीत नाहीं; कायद्यानें स्थापित झालेल्या इंग्रजी राज्याचे आम्ही एकनिष्ठ प्रजाजन आहोंत. आमच्या देशाच्या उद्धारासाठींच परमेश्वरानें इंग्रजांना आमच्या इकडे पाठविलें आहे या सिद्धांतावर के. न्या. रानड्यांप्रमाणें आमचाही विश्वास आहे आमची पूर्वपरंपरा व आमच्या राष्ट्राचें अंतिम ध्येय जें 'देव धर्म आणि नाम' यांचा त्रिवेणीसंगम त्याचा आमच्या लोकांस कोणत्याही प्रसंगीं विस्मृति होऊं नये एवढीच आमची इच्छा आहे. नवें ध्येय व नवी अधिष्ठात्री देवता उत्पन्न करून पूर्वकाळापासून वर्तमानकाळ विलग करूं पाहणें गैर आहे. शाश्वत धर्म हीच हिंदु राष्ट्राचीसर्व कालांत अधिष्ठात्री देवता आहे. 'देव धर्म आणि नाम' यांचा जयजयकार आमच्या राष्ट्रांत होवो एवढीच एक नित्य प्रार्थना परमेश्वरचरणीं करून आम्हीं पुरें करितों.

—वर्ष २ अंक २१

---

# ३ ' ज्ञानेश्वरीचा जीर्णोद्धार. '

यंदा ग्रंथकारांच्या संमेलनांत रा. रा. पांगारकर बी. ए. यांचें ' ज्ञानेश्वरीचा जीर्णोद्धार ' या विषयावर जें व्याख्यान झालें त्याचा सारांश पुढें दिला आहे:—

१. मी आज ' ज्ञानेश्वरीचा जीर्णोद्धार ' ह्या विषयासंबंधानें चार शब्द बोलणार आहे. ज्ञानेश्वरीचा जीर्णोद्धार तीनशें वर्षांमागें श्रीएकनाथमहाराजांनीं केला, तेव्हांपासून ज्ञानेश्वरीची प्रसिद्धी झाली व सर्वांचें लक्ष ह्या अनुपम ग्रंथाकडे वेधलें. ज्ञानेश्वरी हा ग्रंथ मराठी भाषेंत जसा आद्य ह्मणजे कालानें पहिला आहे, तसाच तो योग्यतेनेंही पहिलाच आहे. काव्यदृष्टीनें, धर्मग्रंथ ह्या दृष्टीनें, ज्ञानेश्वरी ग्रंथाचें मराठी वाङ्मयांत नेहमीं पहिलेंच स्थान राहणार आहे. मराठी सारस्वतांत सिंहासनावर बसायची योग्यता ज्ञानेश्वरीचीच आहे. अमृतानुभव हा ग्रंथ सर्वथा स्वतंत्र आहे; पण त्याचा अधिकार सर्वथा सिद्धांचाच आहे. ज्ञानेश्वरी ही ' जाणां नेणां सकळां ' साठीं रचलेली असल्यामुळें ' आबाळ-सुबोध ' झाली आहे. ज्ञानेश्वरीचा जरी जीर्णोद्धार नाथांनीं केला, तथापि त्यांच्या वेळेपासून आजतागाइत ह्या खटपटींत इतरही पुष्कळ लोक गुंतलेले आहेत. आज मुख्य विचार ज्ञानेश्वरींतील ओंव्यांची संख्या निश्चित कशी करावी हा आहे.

२. श्रीज्ञानेश्वरमहाराजांचा जन्म शके ११९७ श्रावण कृष्ण ८ म युवा नाम संवत्सरीं दोन प्रहर रात्रीं आपेगांवीं झाला; व त्यांची समाधि शके १२१८ मध्यें कार्तिक वद्य १३ ह्या दिवशीं दोन प्रहरीं झाली. ह्मणजे त्यांचा अवतार २२ वर्षांचाच होता. त्यांची जन्मभूमी आपेगांव; ज्ञानेश्वरीची रचना शके १२१२ सालीं नेवाश्यास झाली, व त्यांची समाधि आळंदीस झाली. ही कालगणना अगदीं बिनचूक आहे,

कारण, ती ज्ञानोबारायांच्या समकालीन साधुकवींच्याच ग्रंथांवरून दिलेली आहे. ज्ञानेश्वरमहाराजांनीं आपल्या वयाच्या १६ व्या वर्षींच ज्ञानेश्वरीची रचना केली ही गोष्ट निर्विवाद आहे. ६१ व्या वर्षींही व्युत्पन्न पंडितांसही ज्या ग्रंथांचें मर्म कळणें कठिण आहे, त्या ग्रंथांची रचना ज्यांनीं बाळपणींच केली त्यांना जगानें अवतारी कां मानूं नये ! ज्ञानेश्वरानंतर तीनशें वर्षेपर्यंत महाराष्ट्रभर यवनी अंमलाचा दाट अंधःकार पसरला होता व आमचे राष्ट्रीय गुण प्रकट होण्यास अवकाश नव्हता. तथापि ते गुण नाहींसे झाले नव्हते, हें दामाजीपंतादिकांच्या चरित्रावरूनही स्पष्ट समजणार आहे. राष्ट्रपुरुषावर मृतकळा आली होती; पण तो मृत झाला नव्हता. तीनशें वर्षांनंतर महाराष्ट्रांत पुन्हां चैतन्य आलें. त्याच्या प्रारंभींच म्हणजे शके १५०६ मध्यें तारणसंवत्सरीं महाराष्ट्राच्या तारणासाठीं ‘ पाठांतरीं शुद्ध अबद्ध ’ असलेला ज्ञानेश्वरीग्रंथ नाथांनीं पैठणास शुद्ध करून प्रसिद्ध केला. या ज्ञानेश्वरीच्या जीर्णोद्धारानंतर ४० वर्षांनीं शिवाजीमहाराजांचा अवतार होऊन महाराष्ट्र स्वातंत्र्याच्या गिरिशिखरावर आरूढ झाला. ज्ञानेश्वरीग्रंथाच्या जीर्णोद्धाराच्या मागोमाग महाराष्ट्रांत गीता सांगणारा योगेश्वर समर्थरूपानें अवतरला, व ती ही दासबोधरूपी गीता ऐकणारा धनुर्धर ही शिवाजीरूपानें अवतरला.

३. शके १५०६ मध्यें ज्ञानेश्वरीचा जीर्णोद्धार जसा एकनाथांनीं केला तसा तो करणारे इतर पुरुषही महाराष्ट्रांत त्याच वेळीं झाले होते, असें मला उपलब्ध झालेल्या शके १५३२ मधल्या एका जुन्या ग्रंथावरून सिद्ध होतें. त्या ग्रंथाची हकीगत व रचना पाहिल्यावर ज्ञानेश्वरींतील ओव्यांची परिगणना करण्याचा प्रश्न आपणापुढें येतो. नगर जिल्ह्यांत राहणारा भास्कर हा रघुनाथाचा शिष्य होता, व त्यानें गुर्वाज्ञेनें ज्ञानेश्वरीचा जीर्णोद्धार करण्याचा खटाटोप काशीक्षेत्रीं राहून शके १५३२ मध्यें केला. भास्कराचे गुरु श्रीरघुनाथ हे ज्ञानेश्वरानंतर होऊन गेलेल्या वडवाळसिद्ध ह्या पुरुषाच्या संप्रदायांतले पुरुष होते. भास्कर हा नाथांचा समकालीन होता असें म्हणावयास हरकत नाहीं. कारण, त्यानें हा खटाटोप

नाथानंतर २६ वर्षांनींच केला. नाथांचा शोध भास्करास होता कीं नाहीं हें समजत नाहीं, तथापि नाथांची माहिती त्यास असली तरी नाथांनीं ज्ञानेश्वरीच्या प्रती मिळवून त्यांच्यावरून शुद्ध प्रत तयार केली आहे, ही गोष्ट त्यास कळली होती असें दिसत नाहीं. दुर्दैवानें मला भास्करानें शुद्ध केलेली ज्ञानेश्वरीची प्रत मिळाली नाहीं; तथापि त्यानें आपल्या प्रतीला ४०० ओव्यांची जी पुरवणी किंवा पुस्ती जोडली आहे ती मिळाली आहे व तीवरून बऱ्याच गोष्टींचा उलगडा होतो. ज्ञानेश्वराबद्दल मागें जो भारद्वाज व भिंगारकरबोवा ह्यांच्यांत वाद झाला, त्या वादांत भारद्वाजांच्या मताचें भिंगारकरबुवांनीं उत्तम खंडण केलेंच आहे, व त्यांच्याच विचारसरणीला परिपोषक असाच हा भास्कराचा पुरवणीरूप ग्रंथ आहे. ह्यांत महत्वाची एक गोष्ट आहे. शके १५३२ मध्यें ह्या भास्करानें 'ज्ञानेश्वरीचा जीर्णोद्धार' केला–हेंच नांव त्यानें आपल्या ग्रंथास व खटपटीस दिलें आहे–त्या जीर्णोद्धारांत त्यानें दहा सहस्र ओव्या ज्ञानेश्वरींत आहेत असें ह्मटलें आहे. १०५५ ओव्या ढळून गेल्या आहेत व मीं त्या शोधून जेथल्या तेथें बसविल्या आहेत असें भास्कर ह्मणतो! यावरून त्याच्या पूर्वील ज्ञानेश्वरीच्या प्रतींत ८९९५ ह्मणजे 'पांच कमी नऊ हजार ओव्या' होत्या असें स्पष्ट दिसतें.

४. ज्ञानेश्वरींतली ओवी–संख्या निश्चित झाली पाहिजे, पण ती आजवर झाली नाहीं असें मला वाटतें. माझा अल्पप्रयत्न तरी निर्णयात्मक नाहीं. (१) भारद्वाजानें शके १६७५ मधील ज्ञानेश्वरींत 'नवसहस्र नव ओवी' आहे असें ह्मटलें आहे. (२) कुंट्यांनीं छापलेल्या ज्ञानेश्वरींत व आजकाल महाराष्ट्रांत जुन्या ह्मणून सांपडणाऱ्या हस्तलिखित प्रतींत ९०३७ ओव्या आहेत. (३) समर्थांचे समकालीन विठ्ठलस्वामी यांनीं आपल्या भक्तकथामृतसारांत 'नवसहस्र पन्नास ओवी। गीतार्थ ज्ञानेश्वरी' असें म्हटलें आहे. (४) श्री तुकारामशिष्य निळोबा यांनीं वर्णिलेल्या

ज्ञानेश्वरचरित्रांत 'नेवाश्यासी केला भगवद्गीता अर्थ । दहा सहस्र ग्रंथ पूर्ण झाला,' असें म्हटलें आहे. ( ५ ) राजवाडे जुनी ज्ञानेश्वरी छापींत आहेत. ती मुकुंदराजानें लिहिलेली असून ज्ञानेश्वरानंतर लवकरच लिहिली असावी, असें राजवाड्यांचें मत आहे. तो ग्रंथ पुढें आल्याशिवाय त्याविषयीं निश्चित असें कांहींच सांगवत नाहीं; तथापि त्या प्रतींत पावणेनऊ हजार ओंव्या असून बाकीच्या क्षेपक असून मागें घुसडल्या गेल्या आहेत असें त्यांचें मत आहे. ( ६ ) भिंगारकरबुवांनीं ३१८ ज्ञानेश्वरीच्या पोथ्या जमविल्या असून एक शुद्ध प्रत छापण्यासाठीं त्यांनीही तयार केली आहे. पण अद्याप ओवीसंख्या मोजली नाहीं असें त्यांनीं मला कालच सांगितलें. ( ८ ) ह्या सर्व पोथ्यांशिवाय मला मिळालेल्या पोथींत म्हणजे भास्करानें शके १५३२ मध्यें केलेल्या ज्ञानेश्वरी-जीर्णोद्धाराच्या प्रयत्नांत भास्कराच्या शोधाप्रमाणें मूळ ज्ञानेश्वरींत दहाहजार पन्नास ओंव्या असून लेखकप्रमादामुळें एक हजार पंचावन ओंव्या वळल्या होत्या; म्हणजे दहासहस्र पन्नास ओंव्यांची ज्ञानेश्वरी खरी असें भास्करांचें सांगणें आहे; यांत कोणती संख्या निश्चयानें खरी हें आज सांगतां येणें कठिण आहे. मी निरनिराळीं मतें महाराष्ट्रीयांपुढें मांडलीं आहेत. खरी संख्या निश्चित होण्याच्या प्रयत्नास मदत मिळावी एवढाच माझा हेतु आहे. हा मताचा किंवा आग्रहाचा प्रश्न नाहीं; खरें बाहेर यावें हा सर्वांचाच हेतु आहे. सत्यनिर्णयाची शुद्धभावना पोटीं ठेवूनच अशा प्रकारचे उद्योग सर्वांनी निरहंकारानें केले पाहिजेत. कोणत्याही मताचा अभिनिवेश नको.

५. भास्कराच्या ह्या ४०० ओंव्यांच्या ज्ञानेश्वरीला पुरवणीस्वरूप शेवटीं जोडलेल्या ग्रंथांत काय आहे तें आपण आतां पाहूं या. ह्या ओंव्या प्रेमळ असून शोधक मनुष्यानें व परंपरागत गुरुभक्तानें लिहिलेल्या आहेत. ' तुह्मी ज्ञानेश्वरी ऐकली, आतां माझी प्रार्थना ऐका असें ह्मणतांना भास्कर ह्मणतोः—

जी तुह्मी उदारपणें । ज्ञानदेवाचें बोलणें ।
परिसिलें श्रवणें । आद्यंतवरी ॥ ४ ॥

जी हा तुमचा पुरुषार्थु । देखोनिया अतिसमर्थु ।
मजही उपजला स्वार्थु । प्रार्थावया ॥ ५ ॥
जी ह्मणाल ज्ञानदेव थोर । तूं काई येक रंक किंकर ।
तरी येदर्थी जोडुनि कर । विणवीत असें ॥ ६ ॥
तरी मेरूतें घाली पोटीं । आणि परमाणु परता लोटी ।
जी हे कांहीं गोठी, समुद्र करी ! ॥ ७ ॥
गंगेसी पोटीं घालणें । ओहळाशी परते दवडणें ।
हें आहे काय करणें । सागरासी जी ? ॥ ८ ॥

गीतेची महती वाखाणितांना भास्कर ह्मणतोः—

कवणीं येकासी श्रद्धा मनीं । जे गीतानिरोपण आयेकावे कानीं।
हे वार्ता आइकोनी । यमधर्म दचकला ॥ १ ॥

गीताश्रवणाची सद्बुद्धि एखाद्याच्या मनांत उद्भवली कीं ही वार्ता थंड गोळ्यासारखी यमधर्माच्या दरबारांत जाऊन आदळते व यमाच्या अधिकारी-मंडळाची घाबरगुंडी उडून जाते ! गीता व ज्ञानेश्वरी यांविषयीं भास्करानें मनोहर रूपक केलें आहे. गीताप्रासादाचे ७०० खांब असून १ धृतराष्ट्रानें आणला, ९ दुर्योधनानें राज्यमदाच्या मोहानें 'काळापाषाण' असे आणले, १२ संजयानें तयार केले, ८४ अर्जुनानें सत्वगुणाचा पर्वत फोडून घडविले, बाकी ५८४ खांब उपनिषदांचा गिरि फोडून कर्म, ज्ञान व उपासना ह्या तीन खाणींतून सूत्रधार व मुकमणी जो श्रीकृष्ण त्यानें निर्माण केले व याप्रमाणें गीताप्रासादाची उभारणी झाली ! निखळ ब्रह्मविद्येच्या ह्या ७०० श्लोकरूप दिव्य स्तंभांकडे 'जंव जंव पाहिजे । तंव तंव अवघे स्वस्वरूप देखिजे' इतके ते निर्मळ आहेत ! भास्कर ह्मणतो, ह्या गीतारूप भव्य प्रासादांत प्रवेश मात्र

पूर्वी व्युत्पन्न पंडितांचाच होत असे; राजसंनिधानीं सरस्वतभिकच वाड्यांत शिरून योगेश्वर कृष्ण व धनुर्धर पार्थ ह्या गुरुशिष्यांचें दर्शन घेत; पण जे उत्कंठित ' प्राकृत ' दारापाशीं येत, त्यांना ' अबोधाचे काठीकर ' ह्या चोपदार मज्जाव करून हाकलून देत असत. ज्यांना पदज्ञान नाहीं, विभाक्ति कळत नाहीं, व जे व्याख्यान जाणत नाहींत अशांना—पंडित अमृताचे ढेकर देत असून– ' तहान न भागतां ' दूर परतावे लागे !

हें ज्ञानेश्वरासी कळलें । कळोनि स्नेहें उपजलें ।
मग तेणें काय केलें । तें अवधारा स्वामी ॥ १४५ ॥
या प्रासादाचिया महाराजद्वारीं । प्राकृत टीकेचा परोपरी ।
मुक्तिमंडप कुसरी । उभारिला ॥ १४६ ॥
टीका करणें हा पहिला । मनी उच्छावो जाला
हाचि गाढोरा घातला । मंडपासी ॥ १४७ ॥
स्वइच्छा उपजळी । दया पूर्ण दुनावली ।
हेचि भूमिका साधिली । माळ्हसापुरीं नेवासा ॥ १४८ ॥
मग अर्थ वोविये सुरसु । गुंफिला करूणी सायासु ।
हे दाहासहस्र पन्नासु । स्तंभ येथें ॥ १४९ ॥

प्राकृतांकारितां दयाळुपणानें ज्ञानेश्वरांनीं गीताप्रासादापुढें आपल्या टीकेचा मुक्तिमंडप उभारला ! या मंडपांत शिरण्यास सर्वांना अधिकार आहे; कोणांसच मज्जाव नाहीं.

या मंडपाचे चोहूंकडे । सदा दारवठे उघडे ।
येथें काठीवर देव्हडे । नाहीं पदवी भक्तीचे ॥ १६४ ॥

हा मुक्तिमंडप प्राकृत । म्हणोनि सदासर्वकाळ मुक्त ।
या देवदर्शनें समस्त । मुक्तिभुक्ति पावती ॥ १६५ ॥

संस्कृतगीता पंडितांपुरतीच होती:—

तैसी नव्हे प्राकृतगंगा । हे उपेगासी आली जगा ।
सर्वथा लागवेगा । भलतयासी ॥ १६९ ॥
म्हणोनि ज्ञानदेव भला । हा कलियुगीं भगीरथु जाला ।
येणें उपकारू केला । समस्तांसी ॥ १७०

यांचें स्पष्टीकरण नको आहे. सर्व अर्थ उघडच आहे.

६. ज्ञानेश्वरीच्या मूळ ओव्या ११०५० असून त्यांतील कांहीं ढळल्या व पोथ्या अशुद्ध सांपडूं लागल्या, याचीं कारणें भास्कर सांगतो, तीं मननार्ह आहेत:—

आतां असो हे जयालागीं । ज्ञानदेवो अवतरले कलियुगीं
तें कार्य संपादुनि वेगीं । आळंदीसी समाधि घेतली ॥१८९॥
त्या बोला तीनशें अठरा । वरुषें जालीं अवधारा !
म्हणोनि मुक्तिमंडपु पुरा । वोरंगला ॥ १९० ॥
या टीकामंडपाचे रक्षपाळ । आसलगायाचे सकळ ।
येहीं अशुद्धा प्रती करूनि केवळ । विध्वंसिला ॥१९१॥
अर्थवेलीं ढळालिया । मात्रका निघोनि गेलिया
वोविया अशुद्ध जालिया । लेखकयोगें ॥ १९२ ॥
प्रती जालिया बहुतीं । जेहीं लीहिलें बाळमती ।
त्यांचीया आल्पा युक्ती । म्हणोनि अर्थ ढांसळला ॥१९०॥

एक सहस्र पंचावन । वोविया स्तंभ पूर्ण ।
ढळोनि गेले निःसीम । तेणें अर्थमंडप विध्वंसिला ॥२२५॥

"आळंदीस ज्ञानेश्वरांना समाधि घेऊन आज (शके १५३२ सालीं) बरोबर ३१८ वर्षें झालीं; यामुळें मूळ प्रतींत फार घोंटाळे होऊन १०५५ ओव्याच गळून गेल्या" असें भास्कर ह्मणतो. याचीं कारणें त्यानें दिलीं आहेत तीं—(१) अशुद्ध प्रति व अशुद्ध ओव्या लेखकांच्या प्रमादानें पसरल्या [२] लिहिण्यांत अर्थवेली ढकलल्या व मात्राकाने निघोन गेले, अशीं आहेत. ज्ञानेश्वरींत कोणी ओव्या मागून घुसडून दिल्या व त्यामुळें क्षेपक ओव्या त्यांत शिरल्या असें भास्कर ह्मणत नाहीं. मूळ ग्रंथाविषयींच्या पूज्यभावामुळें त्यांत भाविक लोक पदरच्या ओव्या करून घालीत नाहींत. एकनाथांनीं सुद्धां ज्ञानेश्वरींच्या प्रती मिळविल्या; पण 'पाठांतरीं शुद्ध अबद्ध' ज्या झाल्या होत्या तेवढ्याच ओव्या त्यांनीं शुद्ध करून नवीन प्रत तयार केली. त्यांनींच ह्मटलें आहे:—

ज्ञानेश्वरीपाठीं । जो वोवी करील मराठी ।
तेणें अमृताचे ताटीं । जाण नरोटी ठेविली ॥ १ ॥

या ओवींत 'पाठीं' याचा अर्थ 'नंतर' असा कोणी करितात; पण तो चुकीचा आहे. तसा अर्थ घेतल्यास ज्ञानेश्वरीनंतरच्या ओवीबद्ध ग्रंथांना 'नरोट्या' ह्मटल्याचा दोष नाथांवर येईल व स्वतः पाऊण लाख ओव्या रचणाऱ्या नाथांवर तसा दोष येऊं देणें युक्त नाहीं. 'पाठीं' याचा अर्थ 'पाठांत' असाच पाहिजे. ज्ञानेश्वरीच्या पाठांत पदरच्या ओव्या कोणी घालूं नयेत असा नाथांनीं निर्बंध करून ठेवला आहे. नाथांच्या अशा चारयमकी व चारचरणी ज्या पांचसहा ओव्या ज्ञानेश्वरींत आढळतात, त्या सर्वांशीं नाथांच्या नव्हेत. कानामात्रा किंवा एखादा चरण ढळलेला तेवढा नाथांनीं शुद्ध करून घातलेला असावा. नाथांप्रमाणेंच भास्करानेंही केलें आहे, तो ह्मणतो:—

जे अवघे शब्दरत्नांचे । पूर्ण अर्थ प्रकाशाचे ।
आणुनि बैसवीले नेमाचे । जेथील तेथें ॥ २१७ ॥
ते मतिबळें कळासिले । ठाईंचे ठाईं वैसवीले ।
ते अति अपूर्व शोभले । पूर्वरचनेसारखे ॥ २१८ ॥

ज्ञानेश्वरीच्या मूळ ओव्यांच्या शोधनार्थ महाराष्ट्रीयांची प्रवृत्ति व्हावी व सत्यशोधनार्थ ते यत्न करूं लागावेत एवढीच माझी इच्छा आहे. मूळ ज्ञानेश्वरींत किती ओव्या होत्या, नाथांनीं केलेल्या प्रतींत किती होत्या, दीड हजार ओव्या क्षेपक म्हणून त्यांत घुसडल्या गेल्या आहेत का कमी झाल्या आहेत याचा निकाल अद्याप होणें आहे.

७. ज्ञानेश्वरीचा जीर्णोद्धार झाल्यास आमच्या राष्ट्राचाही जीर्णोद्धार होण्यास अवकाश लागणार नाहीं. ज्ञानेश्वरी म्हणजे आचार्यांच्या अद्वैतमताचें प्रतिपादन करून लोकस्थितीच्या मानानें भक्तिपंथाचा उदय करणारा महाप्रासादिक ग्रंथ होय. भागवतधर्माचा किंवा महाराष्ट्रीय संस्कृतीचा तो पाया होय. गीतार्थ ज्ञानेश्वरीइतका उघड झालेला अन्यत्र नाहीं. गीताश्रवणानें पार्थाचें क्लैब्य व मोह नष्ट झाले व युद्धार्थ कृतनिश्चय होऊन तो पुढें आला. ' मामनुस्मर युद्धय ' या गीतारहस्याप्रमाणें वागायला जो तयार होईल त्याला राष्ट्राचा अभ्युदय व मोक्ष या दोघांचीही सांगड घालतां येईल. ज्ञानेश्वरीच्या जीर्णोद्धाराचें काम करणाऱ्याच्या अंगीं एकनाथाची योग्यता पाहिजे. राजवाड्यांच्या ठिकाणीं भक्तिप्रेम नाहीं, ज्ञानेश्वरीनें महाराष्ट्र बुडाला, पंगू झाला, संत निरुपयोगी आहेत, हीं विलक्षण मतें त्यांनीं वारंवार प्रतिपादिलीं आहेत. माझ्या मतानें असा मनुष्य ज्ञानेश्वरीच्या जीर्णोद्धाराचें खरें काम करण्यास अपात्र आहे! राजवाड्यांची शोधकबुद्धि पाहिजे आहे, पण कालनिर्णय वगैरेंच्या अर्वाचीन पद्धतीच्या शोधांचा बहुजनसमाजाला फारसा उपयोग नाहीं. त्यांच्या ठिकाणीं भक्तिभाव, श्रद्धा, ज्ञान, पूर्वपरंपराप्रेम, हेच

गुण वाढले पाहिजेत. संतांची समाजावर विलक्षण छाप आहे. पैठण, पंढरपूर सारख्या क्षेत्रांत मराठी ग्रंथांचें रहस्य जाणणारे व अनुभवी अद्याप आहेत. त्यांच्या मार्गानें प्रेमानें जायला लागा, भक्तिभाव वाढवा, त्याशिवाय राष्ट्रोद्धार होणार नाहीं. गीतोपदेशानें पार्थ युद्धास तयार झाला. ज्ञानेश्वरीच्या जीर्णोद्धारानंतर ४० वर्षांत समर्थ-शिवाजी ही जोडी उत्पन्न झाली. आज बंगाल्यांत ही जी ज्योत पेटली आहे ती गीतेच्या उपदेशाच्या जीर्णोद्धाराचा परिणाम आहे. अंतरंग व बहिरंग अशा दोन्ही दृष्टीनें ज्ञानेश्वरीचा जीर्णोद्धार महाराष्ट्रांत झाला. त्यांतील भावगर्भ लोकांच्या मनांत ठसून भक्तिवैराग्यादि गुणांचा उदय झाला, तर बंगाल्यांत एकांशानें उत्पन्न झालेली ज्योत सहस्रपटीनें वाढून हिंदुस्थानभर पसरेल व मग भारतीयांच्या पराक्रमानें सारें जग दुमदुमून राहील।

—वर्ष २ अंक १८

---

# ४ मूर्तिपूजा.

**लेखांक १**

अवघें ब्रह्मरूप रिता नाहीं ठाव ।
प्रतिमा तो देव कैसा नव्हे ? ॥ १ ॥

श्री तुकाराम.

१. आपण महाराष्ट्रीय लोक किंबहुना सारे हिंदु लोक मूर्तिपूजक आहोंत. आमच्या शास्त्रांनीं व रूढीनें भगवदुपासनेची पहिली पायरी ह्मणून मूर्तिपूजा स्वीकारली आहे. मुसलमान व ख्रिस्ती लोक मूर्तिपूजक नाहींत असें ह्मणतात, पण आपणांस त्यांच्याशीं कर्तव्य नसून आपल्या धर्मांत मूर्तिपूजा कां प्रतिपादिली आहे याचाच विचार करावयाचा आहे. मूर्तिपूजेची यथासांग व यथाशास्त्र प्रक्रिया कोणास पाहवयाची असेल तर त्यानें श्रीमद्भागवताच्या एकादश स्कंधांतील सत्ताविसावा अध्याय नाथांच्या टीकेसह पाहावा. भगवंताच्या पूजेचीं अधिष्ठानें किती आहेत; प्रतिमा किती प्रकारच्या आहेत; पूजेस प्रारंभ कसा करायचा; पाद्यार्घ्याचमनादि विधी कसे करायचे; आवाहन, आसन, स्नान, अलंकार, नैवेद्य वगैरे कसे करायचे; न्यास ह्मणजे काय; वगैरेसंबंधानें तेथें उत्कृष्ट विवेचन केलेलें सांपडेल. आज आह्मांस मूर्तिपूजेचें रहस्य काय आहे एवढेंच पाहावयाचें आहे. ख्रिस्ती लोक सुधारलेले आहेत ह्मणून सांगतात. त्यांची सुधारणा व त्यांचें राज्य यांचा हल्लीं आमच्या देशाशीं संबंध जडून आल्यामुळें त्यांना ज्या गोष्टी प्रिय आहेत त्या आमच्यांतल्या कित्येक लोकांस प्रिय वाटावयास लागल्या; व त्यांच्या अनुकरणेच्छेनें उत्पन्न झालेल्या प्रार्थनासमाज, आर्यसमाज, वगैरे संस्थांनीं त्यांची नक्कल करून त्यांनीं अनादर केलेल्या आमच्यांतल्या चांगल्या गोष्टीही झिडकारून टाकल्या. ख्रिस्ती लोक जातिभेदाला हंसतात ह्मणून त्यांनींही जातिभेदास तुच्छ मानावयास प्रारंभ केला; ख्रिस्ती लोक मूर्ति-

पूजेला तुच्छ मानतात, ह्मणून यांनींही मूर्तिपूजेची निंदा करायला आरंभ केला; खिस्ती लोक दर रविवारीं चर्चमध्यें जाऊन निर्गुणनिराकाराची प्रार्थना करितात, ह्मणून यांनींहीं प्रार्थनामंदिरें स्थापिलीं ! तात्पर्य काय कीं, राज्यकर्त्यांच्या रीति उचलायचें या नव्या लोकांना अचर व्यसन लागलें. सारासारविचारानें व आपलेपणाच्या बुद्धीनें आपल्या समाजाकडे पाहण्याची बुद्धि नष्ट झाल्यामुळें या परप्रत्ययनेयबुद्धि पंडितांनीं इतर पुष्कळ चांगल्या गोष्टींप्रमाणें मूर्तिपूजेची हेळणा करण्यास सुरुवात केली. हें जें त्यांनीं ३०।४० वर्षांपूर्वी धार्मिक व सामाजिक पातक केलें त्याचा परिणाम आमच्या समाजास भोगावा लागत आहे. नवीन शिकलेल्या लोकांपैकीं वर निर्दिष्ट केलेल्या संस्थांचे समासद जरी थोडे असले, तरी बहुतेक शिकलेल्या लोकांच्या मनांतील श्रद्धा पार उडून गेली आहे ! सहजगत्या वाटेनें जातांना रामाचें, मारुतीचें, विठ्ठलाचें किंवा महादेवाचें देऊळ पाहिलें कीं, पटूदिशीं मान खालीं लवायची व नमस्कार करून पुढें पाऊल टाकायची बुद्धि अलीकडच्या लोकांत बुडाली आहे. गणेशोत्सव शेंकडों ठिकाणीं चालू झाले आहेत. गणपतीची मूर्ति स्थापन करून पुढें व्याख्यानादि प्रकार होतात; पण तेथेंही मूर्ति पाहतांच लवून देवताबुद्धीनें नमस्कार करणें हें अलीकडचे सुशिक्षित लोक विसरत चालले आहेत. निर्गुणाची उपासना दुर्घट आहे ह्मणून व सगुणाच्या ठिकाणीं अश्रद्धा झाली ह्मणून नवा समाज श्रद्धारहित झाला आहे ! ज्या समाजाची धर्मश्रद्धा उडून जाते, त्या समाजाची कोठेंही खरी श्रद्धा ह्मणून जडत नाहीं व त्यांत बाह्य डामडौल व उपचार यांचेंच बंड माजतें. धर्मबंधनें विगलित होऊन राष्ट्र क्षयाच्या पंथाला जाणें परकीय अंमलाखालीं जितकें सुकर आहे तितकें स्वराज्यअमलाखालीं तें सुकर नाहीं. ' झालें तें होऊनि गेलें, आतां तरी आपणीं आपणांस शाहणें करावें ' असें समर्थांच्या शब्दांनीं आह्मी आमच्या देशबांधवांस सांगतों.

२. मूर्तिपूजक लोक सर्व देशांत आहेत, किंबहुना सर्वच लोक मूर्तिपूजक आहेत ! मूर्तीची पूजा न करणारा मनुष्य त्रिभुवनांत सांपडणार नाहीं, असें

आम्हीं स्पष्ट विधान करितों ! आम्ही देवतांच्या मूर्ति पुढें स्थापून त्यांची स्नानविलेपनादि गंधाक्षतादि सामग्रीसह विशेष पद्धतीनें पूजा करितों. निराकार व निर्गुण परमेश्वराचें ध्यान डोळे मिटून कसें करितां येतें तें आम्हांस नीट समजत नाहीं ! तो जर निराकारच आहे तर त्याचें ध्यान कोणत्या रूपानें करायचें ! बरें, तो निराकार आहे असें जे म्हणतात तेच असें म्हणण्यानेंच तो साकार आहे असें कबूल करितात ! 'परमेश्वर निराकार आहे,' तर डोळे मिटल्या-क्षणींच त्याच्या निराकारत्वाची जी कल्पना किंवा भावना डोळ्यांपुढें येते तीच त्याची मूर्ति होत नाहीं काय ? 'मी जेवतांना बोलत नाहीं' असें जेवतांना सांगणारा मनुष्य जसा मौनी राहूं शकत नाहीं, त्याप्रमाणें परमेश्वराचें ध्यान करण्यास सरसावणारा मनुष्य 'ईश्वर निराकार आहे' असें सांगण्यास जरी प्रवृत्त झाला तरी असें सांगण्यांतच त्यानें 'ईश्वर साकार आहे' हें कबूल केलें असें सिद्ध होतें ! एकदां एका गुरूपाशीं रामा व गोविंदा हे दोन शिष्य ब्रह्मविद्या शिकण्यास राहिले होते. दोघेही कालांतरानें कृतविद्य झाले. पण दोघांच्या मनोवृत्तींचा ओघ पाहून त्यांस ईश्वरप्राप्तीचे दोन भिन्न मार्ग गुरूनें सांगितले. कृतविद्य झाल्यावर दोघांचा एक दिवस वाद चालला. रामा म्हणाला, 'मला ईश्वराचें स्वरूप काय आहे तें समजलें;' गोविंदा म्हणाला, 'ईश्वर अगम्य व अचिंत्य आहे व त्याचें स्वरूप कळणें आम्हांस शक्य नाहीं; असा माझा तर निश्चय झाला आहे.' या मुद्यावर दोघांची खूप खडा-जंगी उडाली. रामा व गोविंदा वादविवादाच्या भरांत आले, इतक्यांत गुरु-जींची स्वारी तेथें प्राप्त झाली. गुरुजींनीं उभय पक्षांचें म्हणणें ऐकून घेतलें व ते हंसले ! शिष्यांस चमत्कार वाटला असें पाहून ते म्हणाले, 'तुम्ही वादही मांडला, पण तुम्हांत वस्तुतः पाहतां मुळींच मतभेद नाहीं. असें पहा, रामाला ईश्वराचें स्वरूप कळलें आहे, व गोविंदालाही कळलें आहे, मग मतभेद कोठें राहिला ! गोविंदा म्हणतो कीं, ईश्वर अगम्य व अचिंत्य आहे. ठीक आहे. ईश्वर अगम्य व अचिंत्य आहे हें तरी त्याला कळलें आहेना ! ईश्वरस्वरूप

लघुजीवाला कळणें शक्य नाहीं हें तरी त्याला कळलें आहे ना ! ईश्वरस्वरू-पाबद्दल त्याचा कांहीं तरी निर्णय झाला आहेना ! जर असा कांहीं निर्णय रामाप्रमाणें गोविंदाचाही झाला आहे, तर दोघांच्याही मतांत भेद कोठें राहिला ! दोघांच्या मतांत भेद नाहीं, फक्त शब्दांत भेद आहे ! ' ईश्वर साकारही आहे व निराकारही आहे, व जीवाचें उभयरूपाशीं तादात्म्य आहे. पण हें उमजत नाहीं. तें उमजण्याची योग्यता जीवांत यावी म्हणून धर्माची जरूरी आहे. साक्षात् श्रुतींनींही ईश्वर साकार आहे व निराकारही आहे असें सांगितलें आहे. हें दृश्याकार जेवढें विश्व आहे हें ईश्वराचें सगुण रूप आहे. सगुण हें निर्गु-णाकडे जाण्याचें द्वार आहे. 'क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ' या श्लोकांत भगवंतांनीं निर्गुणोपासना अत्यंत कठिण आहे, म्हणून सांगितलें आहे. सिद्धांनाच ती साध्य आहे सगुणोपासना मात्र सर्वसाध्य आहे. श्रुति सगुण स्वरूपाबद्दल सांगतेः—

यस्याग्निरास्यं द्यौ मूर्धा खं नाभिश्चरणौ क्षितिः ।
सूर्यश्चक्षुर्दिशाःश्रोत्रं तस्मै लोकात्मने नमः ॥ १ ॥

त्याचप्रमाणेंः—

द्यां मूर्धानं यस्य विप्रा वदन्ति । खं वै नाभिं चन्द्रसूर्यौ च नेत्रे ।
दिशःश्रोत्रे विद्धि पादौ क्षितिं च । सोऽचिन्त्यात्मा सर्वभूतप्रणेता ॥ २ ॥

संपूर्ण ब्रह्मांड हें परमात्म्याचें सगुण रूप आहे. सर्वांशानें त्याला मापण्याचें आपल्याला सामर्थ्य नाहीं, म्हणून एकांशानें आपण त्याला पाहतों, व म्हणूनच तुकोबा म्हणतात कीं, अवघें ब्रह्मरूप आहे, त्यावांचून वीटभर जागा रिकामी नाहीं, तो सर्व व्यापून दशांगुळें उरला आहे; त्यावांचून जर कोठेंही रिता ठाव नाहीं, तर आम्हीं आपल्या चित्तस्थैर्यासाठीं, भक्तिवृद्ध्यांसाठीं व आत्मनिवेदन रूप भक्तिसुखासाठीं एक हातभर उंचीची प्रतिमा पुढें ठेविली तर ती देवरूप नाहीं असें कसें म्हणता येईल ! हा थोडेसा प्रश्न आहे. परमात्मा असा सगुण आहे तसा निर्गुणही आहे. श्रुतिवचनः—

अपाणिपादो जवनो गृहीता । पश्यत्यचक्षुः स शृणोत्यकर्णः ॥
स वेत्ति वेद्यं न च तस्यास्ति वेत्ता । तं प्राहुरग्र्यं पुरुषं महान्तम्

—श्वेता० ३। १९॥

परमात्मा सगुण आहे तसा निर्गुणही आहे हें सांगितलें. याचा विशेष विचार पुढील लेखांत करूं:—

---

## लेखांक. २.

नको ब्रह्मज्ञान आत्मस्थितिभाव ।
मी भक्त तूं देव ऐसें करी ॥ १ ॥

—श्रीतुकाराम.

ईश्वराचीं सगुण व निर्गुण हीं दोन्हीं स्वरूपें आहेत, हें श्रुतिवाक्याधारें दाखवून दिलें, आतां सगुणोपासना व निर्गुणोपासना याबद्दल थोडीशी चर्चा करावयाची आहे. हिंदुमात्राच्या हाडींमांसीं खिळलेलीं व हिंदुधर्माचीं जीं तीन प्रधान अंगें—कर्म, ज्ञान व उपासना—त्यांपैकीं उपासनेस केवळ आधारभूत असलेली जी मूर्तिपूजा तिचा ऊहापोह केल्यानें धर्मबुद्धीच्या जोपासनेस विशिष्ट वळण लागेल अशा हेतूनें आम्ही हा विषय चर्चेस घेतला आहे. धर्माच्या अंतरंगांतले विषय लिहिण्याचे नव्हत व वर्तमानपत्रांत लिहिण्याचे तर खास नव्हत. श्रद्धा असेल तर ज्या गोष्टीपासून श्रद्धावंताला परमानंद होतो त्या गोष्टीपासून अभाविकाला तसूमात्रही संतोष होणार नाहीं. चंद्रभागेमध्यें बुचकुळी मारली म्हणजे भक्ताला जन्मजन्मांतरीं पातकें एकदम भस्म झाल्यासारखें वाटतें, व अभाविकाला चंद्रभागेचें पाणी विहिरींनाल्यांतल्या सारखेंच दिसतें । 'इंद्रायणीचें जळ जो

सेवी इंद्रपदासीहि निंदीरे ' असें आळंदीस जाऊन मध्वमुनीश्वर म्हणतात; पुण्यांत प्रत्यही गाढवा घोडे उडविणारे शेंकडों ब्राम्हण वेडगाडींनमध्यें हवा खायला जातात, पण आळंदीस जाण्याची त्यांना एकदांही बुद्धि होत नाहीं ! पंढरीस गेल्यावर ' देहभाव हारपला । तुज पाहतां विठ्ठला ' अशी तुकोबाची स्थिती होत असे; पण हजारों लाखों पापाण तेथें जाऊन पाषाणच पाहून येतात ! धर्म हा भावनेचा विषय आहे. भाव तोच देव, भाव तोच धर्म, भाव तोच मोक्ष. भाव नाहीं तर धर्म नाहीं, देव नाहीं व मोक्षही नाहीं. भाव हें धर्माचें सर्वस्व आहे. भावाला या लोकींच्या बाजारांत भाव नाहीं, तो एक बिनमोल पदार्थ आहे. तो ज्यांच्यापाशीं आहे ते त्रिभुवनांतली संपत्ति तुच्छ लेखतात. भाविकासारखा भाग्यवंत दुसरा कोणीच नाहीं. भाविकाचे डोळे जग निराळ्या दृष्टीनें पाहतात. भाविकाला सर्वत्र आनंद व प्रेम सांठविलेलें दिसतें. भावानें भक्ति फळते, भावानें ज्ञान मिळतें, भावानें धर्मगुह्य कळतें, व भावानें पाप जळतें. ' जाणे भक्तीचा जिव्हाळा । तोचि देवाचा पुतळा ' असें तुकोबांनीं सांगितलें आहे तें अक्षरशः खरें आहे. असो. मूर्तिपूजेचा, किंबहुना कोणताही धर्मविषय भक्तिभावाचा ओलावा अंतर्यामीं असल्याशिवाय वाचकांस रुचणार नाहीं. लेखकवाचकांनीं आपल्या चित्तवृत्ति धर्मरहस्याकडे वळविल्यापासून अन्योन्यांच्या सद्वृत्तींचें पोषण होणार आहे.

* परमात्मा सगुणही आहे व निर्गुणही आहे. अंतर्बाह्य एकच स्वरूप कोंदाटलेलें अखंड एकाकारपणानें पाहणें हीच निर्गुणाची खरी उपासना होय, पण हीं ज्याचें द्वैतभान निःशेष निमालें आहे त्यालाच साध्य आहे. नुसते डोळे मिटून बसल्यानें निर्गुणाची भक्ति होत नाहीं. ईश्वराला जीवाची दया येऊन त्यानें जीवोद्धारार्थ वेळोवेळीं जे अवतार घेतले त्यापैकीं एका विशिष्ट अवताराची किंवा एकपणाच्या भावानें अनंत अवतारांची उपासना करणें ही सगुणाची उपासना होय. दोन्ही वस्तुतः एकच आहेत.

तेथें सगुण आणि निर्गुण । उभयरूपें मीचि जाण ।
जैसें सुवर्ण आणि कंकण । तैसीं अभिन्न जाण मद्रूपें ॥१॥
निर्गुणाहूनि सगुण न्यून । ह्मणे तो केवळ मूर्ख जाण ।
सगुण निर्गुण दोन्ही समान । न्यून पूर्ण असेना ॥ २ ॥
विघुरलें तें तूप होये । थिजलें त्यापरीस गोड आहे ।
निर्गुणापरीस सगुणीं पाहे । अति लवलाहे स्वानंदु ॥ ३ ॥
निर्गुणाचा बोध कठिण । मनबुद्धिवाचे अगम्य जाण ।
शास्त्रांसीं न कळे ह्मणून । वेदीं मौन धरियेलें ॥ ४ ॥
वारा उमाणावा वावें । आकाश आकळावें खेवें ।
भावना भांबावली धांवे । काय करावें स्फुरेना ॥ ५ ॥
तैशी सगुण मूर्ति नव्हे जाण । सुलभ आणि सुलक्षण ।
देखतां जाय भूकतान । निवताहे मन सप्रेमें ॥ ६ ॥
जो नित्य शुद्ध सच्चिदानंद । प्रकृतिहून पर परमानंद ।
सगुण साजिरा गोविंद । स्वानंदकंद स्वलीला ॥ ७ ॥
धैर्य वीर्य उदार कीर्ति । गुणगांभीर्य शौर्य ख्याती ।
यासी कारण माझी सगुणमूर्ति । जाण निश्चितीं उद्धवा ॥ ८॥
माझी मूर्ति देखिल्या पाठीं । न लगे योगयाग आटापाटीं ।
न लगे रिघावें गिरीकपाटीं । नानासंकटीं न पडावें ॥ ९ ॥
दीपकळिका हातीं चढे । तैं घरामीतरीं प्रकाशु सांपडे ।
माझी मूर्ती जैं ध्यानीं जडे । तैं चैतन्य आतुडे अवघेंचि ॥१०॥

या उपपत्ति उद्धवा तूं देख । सगुण निर्गुण दोन्ही एक !
जाण पां निश्चयो निष्टंक । सच्चिदानंदसुख समत्वें ॥ ११ ॥

नाथ भागवत अ. ११.

---

लेखांक ३.

५ वरील उताऱ्यांत नाथ ह्मणतातः—" जसें सुवर्ण आणि कंकण अभिन्न आहेत, तशीं सगुण आणि निर्गुण हीं परमात्म्याचीं उभय रूपें अभिन्न आहेत. निर्गुणाहून सगुण न्यून आहे असें ह्मणणारे केवळ मूर्ख आहेत ! उलट सगु. णाचीच प्रीति जास्त. वितळलेल्या तुपापेक्षां थिजलेल्या तुपाच्या वड्या जशा अधिक गोड लागतात, त्याप्रमाणें निर्गुणापेक्षां सगुणाची गोडी अधिक आहे. मन, वाचा व बुद्धि यांना निर्गुणाचा बोध होत नाहीं; शास्त्रांना—मग तीं शास्त्रें भौतिक असोत वा आधिभौतिक असोत—निर्गुणाची खूण कळत नाहीं व वेदांना सुद्धां त्यापुढें हात टेंकावे लागतात ! दोन्ही हातांच्या चावेंत वायूला जसें पकडतां येणें शक्य नाहीं, आकाश सेवेंत ( मिठींत ) सांपडणें जसें साध्य नाहीं, त्याप्रमाणें वेदशास्त्रांच्या साह्यानें सुद्धां निर्गुण परमात्मा, बुद्धि, वाचा व मन यांना गोचर होणें कदापि शक्य नाहीं ! पण तशी सगुण मूर्तीची गोष्ट नाहीं. ती सुलभ आहे व सुलक्षण आहे. सगुणाचें दर्शन होतांच मुक्तज्ञान हरपतें व मन प्रेमयुक्त होतें. परमात्मा नित्यशुद्ध आहे, सच्चिदानंदरूप आहे, सगुण आहे, मनोहर आहे, इंद्रियांना वेध लावणारा आहे, आनंदाचा कंद आहे, व लीलावतारी आहे. धैर्य, वीर्य, औदार्य, गांभीर्य, शौर्य इत्यादि गुणांना तो आधार आहे. तो सगुण व साकार असल्यामुळें हे गुण त्याच्या आश्रयानें राहतात, व मानवांना त्याच्या सगुण मूर्तीमुळें या गुणांची ओळख होते ! मूर्तीचें दर्शन झाल्यावर योगयागादिकांची आटाटी करण्याचें, गिरिकंदरें धुंडाळण्याचें किंवा नाना संकटांत पडण्याचें बिलकूल कारण नाहीं. एक दीप हातीं

घेतल्यावर जसा सार्‍या घरभर प्रकाश पसरतो, त्याप्रमाणें त्याच्या सगुण मूर्तीचें ध्यान करूं लागलें म्हणजे अवघें ब्रह्मस्वरूप होतें. याप्रमाणें विचार केल्यावर स्पष्ट बोध होतो कीं, सगुण निर्गुण दोन्ही एक आहेत तथापि सगुणोपासनेनें ब्रह्मप्राप्ति होऊन शिवाय भगवंताच्या गुणांची ओळख होऊन त्याविषयीं अनिवार प्रेम उत्पन्न होतें. "

६ ज्ञानेश्वरमहाराजांनीं या विषयाचा निवाडा बाराव्या अध्यायाच्या टीकेंत केला आहे. ' तरी व्यक्त आणि अव्यक्त । हें तूंचि एक निभ्रांत ' असा प्रारंभ करून ' अव्यक्ता हि गतिर्दुःखं ' या चरणाच्या टीकेंत आपला अभिप्राय स्पष्ट सांगितला आहे. " बोचर्‍यानें लोहाचे चणे खाल्ले तर दांत पडून तो व्यर्थ दांतरा मात्र होईल, किंवा समुद्र तरण्याची प्रतिज्ञा करून समुद्रांत उडी घालणारा बुडून जसा प्राणास मुकेल त्याप्रमाणें देहवंत जीवांची अव्यक्तीं गति होईल : सर्वेंद्रियांसहित परमेश्वराच्या सगुणमूर्तीच्या ठिकाणीं प्रेमभावाच्या पडिभरानें चित्त अहोरात्र ठेवणारे भक्तच परमात्म्याला अत्यंत प्रिय आहेत. अमृताच्या सागराचें जें सामर्थ्य तेंच अमृतलहरीच्या एका चुळींत आहे, किंवा शेरभर सोन्याच्या लगडीला जो कस आहे तोच एक वालभर सोन्यास आहे, त्याप्रमाणें ' एकदेशिया व्यापका । सरसा पाडू ' म्हणजे अव्यक्त व व्यक्त किंवा निर्गुण व सगुण यांची योग्यता तुल्य आहे. सगुण व निर्गुण यांची योग्यता जरी सारखी आहे, तरी निर्गुणाची उपासना अत्यंत दुर्घट आहे; निदान अर्वाचीन काळच्या धुमारणचक्रांत सांपडलेल्या आम्हां जीवांना तर सर्वथैव दुरापास्तच आहे. हिमाचलाच्या विस्तीर्ण, निरामय व प्रशांत प्रदेशांत निरंतर वास करणाऱ्या मुनीश्वरांना निर्गुणप्राप्ति सुसाध्य असेल, पण संसाराटवींत वणवण करीत हिंडणाऱ्या व २४ तासांत अनंत वृत्तींच्या तरंगांशीं झगडत राहणाऱ्या आम्हांसारख्या संसारी जीवांना तरी तीं अकष्टसाध्य आहे. वेदकाळींही सगुणोपासना होती. वरुण, इंद्र, उषा, सूर्य वगैरे सर्व एका परमात्म्याच्या व्यक्त मूर्ति आहेत, अशाच भावनेनें

वेदकाळीं आमचे पूर्वज त्यांची उपासना करीत होते. अव्यक्तांतून व्यक्त निघालें आहे व व्यक्तांतूनच अव्यक्ताकडे जायला पाहिजे आहे. आकाशापासून वायु, वायूपासून अग्नि, अग्नीपासून आप, आपापासून पृथ्वी, पृथ्वीपासून औषधी, औषधीपासून संतती, अशी उत्पत्तीपरंपरा आपल्या श्रुतिशास्त्रांनीं सांगितली आहे. संहारपरंपरा उलट क्रमानें होत जाणार आहे. पृथ्वीचा लय आपांत होईल, आपाचा अग्नींत, अग्नीचा वायूंत, व वायूचा आकाशांत. हा जसा उत्पत्तिलयाचा प्रकार क्रमाक्रमानें होतो, त्याचप्रमाणें जें अरूप होतें तें रूपास आलें आहे, व रूपाच्या एकनिष्ठ चिंतनानेंच अरूपांत पुन्हा जाऊन मिसळायचें आहे. सगुणरूप परिच्छिन्न आहे असें वाटतें व परिच्छिन्न वस्तूचें ध्यान करून काय होणार असें निर्गुणवादी ह्मणतील; पण मन, बुद्धि, व वाचा याच आपल्या अगोदर परिच्छिन्न आहेत, मग या अपरिच्छिन्न वस्तूचें ध्यान तरी कशा करूं शकतील? ह्मणजे सगुणाचें ध्यान करावें, सगुणाचे गुण गावे, सगुणाच्या लीला वर्णाव्यात व ऐकाव्यात, सगुणाशीं पूर्ण तादात्म्य पावावें, ह्मणजे धारणाशक्ति जसजशी वाढत जाईल तसतसें अद्वैत चैतन्य आतुडेल! भक्तांना तर सगुणप्रेमा अद्भुत असल्यामुळें निर्गुणाची भीतिच वाटे. "आत्मस्थितिभाव, देवा! मला नका हो देऊं. तुह्मी देव आणि मी तुमचा भक्त अशीच स्थिति नेहमीं राहूं द्या." असें तुकोबा काकुळतीनें देवाला मागतात. सर्व भक्त अखेर निर्गुण पदाला पोंहचतातच, पण सगुणप्रेमा त्यांच्या ठिकाणीं अलोट असतो.

* सगुणमूर्तीचा पूजाविधि श्रीनाथमहाराजांनीं भागवताच्या तिसऱ्या अध्यायांत सुरेख सांगितला आहे. सगुणोपासना दोन प्रकारची आहे. हें विश्वमंदिर परमेश्वराची सगुणमूर्तिच आहे. जो हा बाह्य डोलारा उभारला आहे त्याच्याकडे दृष्टि ठेवून परमात्म्याची उपासना करणें हा सगुणोपासनेचा एक प्रकार, व परमेश्वरानें युगायुगाच्या ठायीं जे अवतार घेतले त्यांची उपासना हा दुसरा प्रकार.

## लेखांक ५.

८ मागील लेखांकांत सगुण व निर्गुण यांचा निवाडा केला, व 'सगुणोपासनाच जीवांना कशी इष्ट आहे हें दाखविलें. या लेखांत सगुणोपासनेचे दोन प्रकार कोणते आहेत तें विशद करून दाखवावयाचें आहे. परमात्माच जगद्रूपानें नटलेला असल्यामुळें या विश्वमंदिरांत स्थित झालेल्या व अनंत रूपानें प्रतीत होणाऱ्या परमात्म्याची उपासना करणें हा एक प्रकार, व साधूंच्या परित्राणासाठीं, दुष्टांच्या विनाशासाठीं व धर्माच्या संरक्षणासाठीं भगवंतानें वेळोवेळी जे अवतार घेतले त्यांपैकीं एकाची किंवा अनेकांची परमात्मभावानें उपासना करणें हा दुसरा प्रकार. आमच्याकडे दोन्ही प्रकारांनीं परमात्म्याची उपासना करण्याचा प्रघात आहे. कोणत्याही रूपानें व पद्धतीनें परमेश्वरास भजलें तथापि तो विश्वात्मा असल्यामुळें ' सर्व देवनमस्कारः केशवं प्रति गच्छति ' यान्यायानें त्यालाच ती उपासना पोंहोंचते.

९ प्रथम सगुणोपासनेचा जो पहिला प्रकार सांगितला त्याचा विचार करूं. परमात्मा व दृश्य सृष्टि म्हणजे प्रपंच यामध्यें भिन्नता नाहीं. हा वाढलेला प्रपंच ईश्वराचें अभिव्यक्त स्वरूपच आहे! प्रपंच हा विवर्तरूपानें त्यावर भासत आहे. नाथांनीं भागवतांत सांगितलें आहे:—

> जगाचें मूळकारण । अंगें ईश्वरचि आपण ।
> त्या कारणाहूनि कार्य भिन्न । नव्हे जाण सर्वथा ॥ १ ॥
> हो कां घृताची एके काळीं । थिजोनि झाली पुतळी ।
> ते घृताहोनि वेगळी । नाहीं देखिली प्रत्यक्ष ॥ २ ॥
> सुवर्णाचें झालें लेणें । तें जेवीं निरवे सोनेपणें ।
> तेवीं महाभूतें-विषय-करणें । अभिन्नपणें चिद्रूप ॥ ३ ॥
> मृत्तिकेची गोकुळें केलीं । नानानामाकारें मृत्तिकाचि ।"

परी ते मृत्तिकाची संचली । तेवीं सृष्टि झाली मद्रूपें ॥ ४ ॥
जेवीं सूक्ष्म वटबीज केवळ । त्यासी मिनल्या भूमिजळ ।
वाढोनियां अतिप्रबळ । वृक्ष विशाळ आभासे ॥ ५ ॥
तेथें नामरूप पुष्प फळ । तें बीजचि आभासे समूळ ।
तेवीं जगदाकारें सकळ । भासे केवळ चिदात्मा ॥ ६ ॥

श्री एकनाथ महाराजांनीं याप्रमाणें या विषयाचें उत्कट विवरण ( भागवत अ. १२ ) केलें आहे. त्यांनीं तंतु आणि वस्त्र यांचा पुढें दृष्टांत देऊन ' सुतावेगळें वस्त्र न दिसे । मज वेगळा प्रपंच नसे ' असें सिद्ध करून दाखविलें आहे. संपूर्ण जग ईश्वररूप आहे हें पाहणें व सर्वकाळ हें देखणेपण कायम ठेवणें ही सगुणाची उपासना करण्याचा पहिला प्रकार होय. जें जें भूत आढळेल तें तें भगवद्रूप आहे असें नित्य वाटलें पाहिजे, हें भावायला लागलें म्हणजे जिकडे तिकडे पहावें तिकडे तिकडे भगवद्रूपावांचून अन्य कांहीं दिसणारच नाहीं. स्नान होतांक्षणींच शरीरशुद्धि होते, व पूजासंभार पुढें मांडून यथाविधी पूजा करावयास बसण्यापूर्वींचा जो काळ वस्त्रपरिधान करण्यात जातो त्या काळांत हीच भावना उत्पन्न व्हावी म्हणून ' पुरुषसूक्त ' म्हणण्याचा परिपाठ पडला आहे. ' सहस्रशीर्षा पुरुषः सहस्राक्षः सहस्रपात् । स भूमिं विश्वतो वृत्वात्यतिष्ठद्दशांगुलम् ' ब्रह्मांडांत कोट्यावधि प्राणी आहेत त्यांचे अनंत पाय, अनंत डोळे, अनंत मस्तकें हीं सर्व एका परमात्म्याचींच आहेत. सहस्र म्ह० केवळ हजार नव्हे, तर अनंत. पुरुषाला सहस्र शीर्षें आहेत म्ह० जेवढे जेवढे शीर्षवंत प्राणी आहेत तेवढे तेवढे परमात्म्याचेच देह आहेत. जारज, अंडज, स्वेदज व उद्भिज या चार खाणिकोटी आहेत. त्या खाणिकोटींतील जेवढीं जेवढीं तोंडें परमात्म्याचींच, जेवढे हात तेवढे परमात्म्याचे, जेवढे पाय तेवढे परमा-

त्याचे, जेवढे होते तेवढे परमात्म्याचे ! ही सजीव सृष्टि सर्व एकाच परमात्म्याचीं रूपें आहेत. केवढी व उदात्त व उन्नत भावना ! किती पवित्र व किती श्रेष्ठ ! " ब्राह्मणोऽस्य मुखमासीद्बाहू राजन्यः कृतः । ऊरू तदस्य यद्वैश्यः पद्भ्यां शूद्रोऽभिजायत. " चारही वर्णांचे जीव एकाच परमात्म्याचे अवयव आहेत. हें पुरुषाचें सूक्त अर्थ मनांत आणून ब्राह्मणाच्या मनांत किती पवित्र व उदात्त भावना येतात व सर्व ब्रह्मांड एकाच परमात्म्याचें एकरूप आहे अशी एकात्मतेची भावना दृढ होऊन किती उच्चतम आनंदाचा अनुभव घेतो ! 'जें जें पाहे भूत । तें तें देखे भगवंत' असा भाव या प्रकारानें मनांत बिंबत जातो. दुसरें उदाहरण. हेंच तत्व बिंबवण्यासाठीं सृष्टींत पवित्र, सुंदर व श्रेष्ठ वस्तु जेवढ्या जेवढ्या आहेत तेवढ्या तेवढ्या आमच्या धर्मानें उपासनार्ह ठरविल्या आहेत. सूर्याची उपासना याच प्रकारची. नानाप्रकारचे वृक्ष, गाई इत्यादि पशु, गरुड इत्यादि पक्षी, मारुति इत्यादि वानर, अनेक प्राणिकोटींतले अनेक श्रेष्ठ जीव त्यांच्या त्यांच्या त्या त्या गुणास्तव पूजार्ह ठरविले आहेत. या अनेकांत एकपण पाहणें हा या सर्वांच्या पूजेचा हेतु आहे. श्रीमद्भगवद्गीतेच्या १० व्या अध्यायांत व भागवताच्या अकराव्या स्कंधाच्या १६ व्या अध्यायांत विभूतिविस्तारयोग सांगितला आहे त्याचें तरी रहस्य हेंच आहे. सर्व आदित्यांत, नक्षत्रांत, वेदांत, अक्षरांत, इंद्रियांत, पशुंत, मनुष्यांत, वृक्षांत, जलचरांत सर्वत्र एक परमात्मा सर्वभूतांच्या हृदयांत बीजरूपानें वास करीत आहे आणि सर्वभूताशयस्थित आत्मा एकच आहे, अज व अव्यय आहे हें प्रथम बुद्धीला कळून नंतर भगवत्प्रसादानें नित्य अनुभवाला यावें असा या उपासनेचा हेतु आहे. समदृष्टि, भूतदया, वगैरे सर्व सद्गुण या एका भावनेच्या पोटांत आहेत व 'एकमेवाद्वितीयं ब्रह्म' या अद्वैताच्या सिद्धांताची प्रतीति [illegible] दिसावयाला हवी तर [illegible] सगुणोपासनेचाच [illegible] घेतला पाहिजे ! [illegible] एकात्मता हेंच उपासनेचें रहस्य आहे.

जीवानें परमात्म्याचें ध्यान करतां करतां भगवत्स्वरूप होऊन जावयाचें आहे. द्वैतपणा प्रेमलक्षणाभक्तींत परमसुखाला कारणीभूत होतो; म्हणूनच तुकोबा प्रेमातिशयाच्या आनंदांत येऊन:—

नको ब्रह्मज्ञान आत्मस्थिती भाव । मीं भक्त तूं देव ऐसें करी ॥ १ ॥

असें म्हणतात. या उद्गारावरून तुकोबा द्वैतवादी होते असें कांहीं अर्वाचीन पंडित म्हणतात. पण तें साफ चुकीचें आहे. सगुणभक्ति व अद्वैत तत्वज्ञान यांचा उत्कृष्ट मिलाफ आमच्या धर्मानें केला आहे. नित्य द्वैतांत राहिल्यास भक्ति उत्पन्न होणेंच शक्य नाहीं. समर्थ म्हणतात—

विभक्तपणें राहावें । आणि भक्तचि म्हणावें ! ।
हें अवघेंचि जाणावें । विलक्षण ! ! ॥ १ ॥

तुकोबांचेही स्वानुभवाचे उद्गार 'गोडीपणें जैसा गूळ । तैसा देव झाला सकळ' असेच आहेत.

१० असो. तर विश्वात्मक देवाची प्रतीति यावी असा सगुणोपासनेचा हेतु पुरुषसूक्त, विभूतिविस्तारयोग वगैरे प्रकारांवरून स्पष्ट दिसत आहे. सर्व विभूति भगवद्रूपच आहेत, तरी पण ध्याननिष्ठेसाठीं उपासकानें एकाच विभूतीची सर्वात्मभावानें पूजा केली की ती परमात्म्यालाच पावते यांत संशय नाहीं. सूर्योपासक, गाणपत्य, शैव, वैष्णव, फार [illegible] पण माईची, वडाची, व नदीची पूजा करणारे लोकही ईश्वराचीच पूजा करितात. मूर्तिपूजेवर करडी नजर ठेवणारे परधर्मी लोक किंवा आमच्यांतले समाजिष्ट वगैरे सुधारक चूक करितात ती येथेंच होय. तुळशीची पूजा करणाऱ्या [illegible] बांधलेलें [illegible] मारून तुळस उपटून टाकणारे [illegible] सुधा-(आर्यमित्र २५।३० वर्षांमागें इकडे [illegible] झाले होते ! [illegible] तरी 'मूर्ख [illegible] तुळशीची पूजा करिते व [illegible] त्यापासून [illegible] तर [illegible] ' असे उपेक्षाबुद्धिनें [illegible] पंडित फार आहेत, पण त्या [illegible] पूजना-

गाजिलें तत्त्व सांगून शहाणी करणारे पति मात्र दुर्मिळ आहेत ! [illegible] नांवानें आमचे लोक नुस्ती ओरड करीत आहेत व लौकिकांत त्यांचा डांगोरा पिटण्यांत चूर झाले आहेत, पण खरी आस्था कोठेंही दिसत नाहीं. स्त्रीच्या आध्यात्मिक उन्नतीची कळकळ बाळगणारे पति विरळ आहेत. स्त्रिया तुळशीची पूजा करितात, पण तुळस ही राधा म्ह० ' भगवदाराधना करणारी प्रेमवृत्ति ' आहे हें स्त्रीला सांगून तिच्या श्रद्धाभावाला योग्य वळण लावणें हें पतीचें काम नाहीं काय ! तुळस काय, वड काय किंवा कोणतीही मूर्ति काय, आपला भाव वाढविण्याला साह्यभूत होणारी आहे. वटपौर्णिमेला स्त्रिया वडाची पूजा करितात त्याचा तरी हेतु काय ! वटवृक्षाखालीं सावित्रीनें आपल्या पतीला यमाच्या हातून सोडविलें ह्या पवित्र कथेचें स्त्रियांना स्मरण व्हावें, सावित्रीचें ध्यान लागावें व तिच्या पातिव्रत्यधर्माची त्यांच्या चित्तास ओळख व्हावी हाच हेतु वटपूजेचा नाहीं काय ! वटवृक्ष हें उपलक्षण आहे. सर्व मूर्तींची गोष्ट अशीच आहे. आवाहन, विसर्जन सर्व सृष्ट पदार्थांना आहे. गणपतीच्या मूर्तीची प्राणप्रतिष्ठा करायची, म्हणजे तरी काय ! विसर्जन केव्हां व कसलें ! तुकोबांनीं स्पष्ट सांगितलें आहे कीं,

शिवपूजा शिवासि पावे । मातिमातीशीं सामावे ॥

हाच प्रकार सर्व मूर्तींच्या पूजेचा आहे. संध्याकाळीं दिवा लावतांक्षणींच दिव्याला नमस्कार करायची जुनी सद्रीति होती. हा नमस्कार त्या वातीला का, समईला, का तेलाला ! हा नमस्कार त्या ज्योतीला, अंधकाराला दूर करणाऱ्या, प्रकाश देणाऱ्या व आमचे व्यवहार चालविणाऱ्या तेजोमय परमात्म्याला आहे. मूर्ति हें उपलक्षण आहे. [illegible] देवतांची स्थापना करून [illegible] गृहमंदिरांत ठेवायची व नंतर उद्यापन करायचें. आम्ही मूर्तिद्वारें परमात्म्याचीच पूजा करितों. भगवंताची मूर्ति पाहतांच भाविकाला प्रेमपान्हा फुटतो व [illegible] येतो ! समर्थ सांगतात :—

जगीं पाहतां सर्वही कोंदलेंसे । अभाग्या नरा हद पाषाण भासे ।

११ सगुणोपासनेचा दुसरा प्रकार ह्मणजे ईश्वराच्या अवतारांची उपासना. हे अवतार दहा आहेत, चोवीस आहेत, अनंत आहेत. जगांत जेव्हां जेव्हां अधर्म होतो, तेव्हां तेव्हां भक्तरक्षणासाठीं देव अवतार घेतो व जगाला मार्ग दाखवून देतो. ज्या ज्या संपत्तिद्‌युक्त विभूति आहेत त्यांच्या द्वारें परमेश्वराची उपासना होते. या विभूति आजवर अमित झाल्या आहेत.

आंगींचिया रोमा किती । जयाचिया तयासीं न गणवती ।

तैसिया माझिया विभूति । असंख्य मज ॥ ज्ञाने. १०–२१०.

श्रीदत्त, श्रीराम, श्रीकृष्ण, ज्या ज्या अवताराच्या ठिकाणीं ज्याची ज्याची स्वभावधर्मानुरूप श्रद्धा बसेल त्या त्या अवताराची अविरुद्धभावानें त्यानें उपासना करावी ह्मणजे ती परमात्म्याला पावते. तो बाह्यरूपाकडे पाहत नाहीं, भावाकडे पाहतो.

—वर्ष १ अंक १८।२०।२१।२७

# ५ नारदभक्तिसूत्रें.

तैसें उन्मत्त तेंचि तरे । तेंचि सर्वज्ञता सरे ।
जें मनोबुद्धि भरे । माझेनि प्रेमें ॥ ४५५ ॥

—श्रीज्ञानेश्वरी. अ. ९.

१ नारदभक्तिसूत्रें ह्या लहानशा ग्रंथांत काय सांगितलें आहे हें आज आम्ही आपल्या वाचकांस सांगणार आहोंत. हीं सूत्रें अवघीं ८४ असून ग्रंथ निर्णयसागर छापखान्यांत एक आण्यास मिळतो इतका तो लहान आहे, तथापि ज्ञानेश्वर महाराजांनीः--

बिंब तरी बचकेएवढें । परि प्रकाशा त्रिभुवन थोकडें ।
ग्रंथाची व्याप्ति तेणें पाडें । अवलोकावी ॥ १ ॥

ह्या ओवींत म्हटल्याप्रमाणें सूर्यबिंब बचकेएवढें असूनही त्याचा प्रकाश जसा त्रिभुवनांत पसरतो, त्याप्रमाणें ह्या लहानशा ग्रंथाची व्याप्ति आहे. हीं सूत्रें रोज एका ठराविक वेळीं नित्य पाठाप्रमाणें म्हणावयें मनांत आणलें तर पांच घटकेपेक्षां जास्त वेळ लागणार नाहीं. एखादें सूत्र घेऊन मनाशींच गुणगुणत व मनन करीत बसलें तर एकेक दिवसही पुरणार नाहीं! सूत्र म्हटलें कीं तें अल्पाक्षर महदर्थ असतें. नारदभक्तिसूत्रें हीं अशींच आहेत. भक्तिपंथानें जाऊं इच्छिणाऱ्या प्रत्येक भाविकानें एक ' आणा ' देऊन हीं भक्तिसूत्रें कंठांत अडकवावींत म्हणजे मोक्षद्वाराकडे जावयास जातां येईल एवढेंच म्हणून ह्या सूत्रांत कसल्या दिव्य ज्ञानाच्या कुंज्या आहेत हें आतां पाहूं.

प्रथमच ' भक्ति ' ची व्याख्या केली आहे:--

सात्वस्मिन्परमप्रेमरूपा ॥ २ ॥

अमृतस्वरूपा च ॥ ३ ॥

' भक्ति ही परमेश्वराविषयीं अत्यंत प्रेमरूपा व अमृतस्वरूपा आहे. ' या अमृतस्वरूपी सूत्रावर आम्ही भाष्य तें काय करणार ! प्रेमाचें रूप शब्दांनीं कोण सांगू शकेल ! पुढें ५१ व्या सूत्रांत ' अनिर्वचनीयं प्रेमस्वरूपं ' असें स्पष्ट म्हटलेंच आहे. प्रेमाचें स्वरूप सांगतां येणार नाहीं. भक्त व्हावें आणि प्रेमसुख अनुभवावें ! अनुभवावांचून प्रेमसुख जाणतां येणार नाहीं. प्रेम ही अमृताची धार आहे व हिचा अभिषेक परमात्म्यावर भक्तजन नित्य करीत असतात. हृदय परमप्रीतीनें नित्य आर्द्र असणें, परमेश्वरप्रेमानें निरंतर पाझरत असणें, हें किंवा भक्तांच्या हृदयालाच ठाऊक असतें ! भक्तांच्या हृदयांत परमेश्वरावांचून दुसरें कांहीं नसतें,- परमेश्वरही भक्तप्रेमाला भुलून भक्तांचें हृदय कधीं सोडीत नाहीं. साखर आणि गोडी ह्याप्रमाणें त्यांचा अन्योन्यप्रेमा आहे. देव व भक्त, देवाचें व भक्तांचें हृदय ह्यांत भिन्नपणा असत नाहीं. नामदेवासारखेपरमभक्त:---

तुझें प्रेम माझें हृदया आवडी । चरण मी न सोडीं पांडुरंगा ॥२॥
इंद्रियांचे व्यापार अवघेचि तोडीं । प्रेमरसगोडी देई मातें ॥ २ ॥

असेंच देवापाशीं निरंतर मागत असतात.

प्रेमसुख देई प्रेमसुख देई । प्रेमेंवीण नाहीं समाधान ॥ १ ॥

असा एकनाथासारख्या महाज्ञानी पुरुषांचा अनुभव आहे. परमेश्वराचें नामसंकीर्तन करितां करितां ' प्रेमाच्या अमृतें रसना ओलावली । मनाची राहिली वृत्ति पायीं ' असा तुकारामासारख्या भगवद्भक्ताचा उद्गार आहे. भक्तिसुख हेंच अमृतपान आहे. अमृत म्हणून कांहीं दूध दुधासारखा पातळ प्रवाही पदार्थ नाहीं ! अमृत म्हणजे मोक्ष; आणि मोक्ष म्हणजे [illegible] बंधनापासून व तीं बंधनें [illegible] पाशांपासून मुक्तता, किंवा निर्वासन व निर्विकल्प [illegible] शिवस्वरूपच आहे ! विषयवासनेंत चित्त गुंतलेलें [illegible]—व मरणाच्या फेऱ्यांत

अनुज्ञा पाळल्यानें व वेदशास्त्रविरोधक गोष्टींविषयीं व ग्रंथांविषयीं उदासीन राहिल्यानें एकनिष्ठता प्राप्त व्हावी, ( सूत्र ११ ). वेदशास्त्राला अनुकूल असें आपलें वर्तन ठेवावें व पाखांडमताच्या वाऱ्यालाही उभें राहूं नये. भोजनादि व्यापार शरीर आहे तोंपर्यंत जर चुकत नाहींत, तर शास्त्राची मर्यादा पाळण्यानें काय बिघडतें !

१ भक्तीचें लक्षण काय हें शब्दांना स्पष्ट करणें कठिणच आहे. तुकाराम महाराज ह्मणतातः—

प्रेम नये सांगतां बोलतां दावितां । अनुभव चित्ता चित्त जाणे ॥ १
सांपडे हा देव भाविकाचे हातीं । शाहणे मरती तरी नाहीं ! ॥ २ ॥

जीं जीं भक्तीचीं लक्षणें लावाल तीं तीं कमीच पडतील. नारदांनीं इतरांनीं दिलेलीं भक्तिलक्षणें प्रथम देऊन नंतर स्वतःचें दिलें आहेः—

पूजादिष्वनुराग इति पाराशर्यः ॥ १६ ॥ कथादिष्विति गर्गः ॥ १७
आत्मरत्यविरोधेनेति शांडिल्यः ॥ १८ ॥ नारदस्तु तदर्पिताखिलाचारता
तद्विस्मरणे परमव्याकुलतेतिच ॥ १९ ॥

" परमात्म्याच्या पूजादिकांच्या ठिकाणीं प्रीति असणें असें व्यासांनीं भक्तीचें लक्षण केलें आहे. भगवंताच्या लीलांचें श्रवण करणें हें गर्गांनीं भक्तिलक्षण दिलें आहे. स्वस्वरूपीं रत होणें असें शांडिल्यमुनींनीं भक्तीचें लक्षण बांधलें आहे. नारदांनीं भक्तिलक्षण केलें आहे तें सर्व कर्में भगवंताला अर्पण करणें व त्याचें क्षणभर विस्मरण झालें असतां विव्हळ होणें असें आहे. " हीं सर्व लक्षणें बरोबर आहेत. पूजानुराग, कथानुराग, आत्मानुराग हे भक्तीचेच प्रकार आहेत. प्रेमलक्षणा भक्ति सर्वोत्कृष्ट होय. मनानें, वाचेनें, देहानें जो जो व्यापार होत असतो तो तो भगवदर्पण करणें; मनाची जेथें तिकडे धाव जरी निसटून जाते तरी शुभाशुभ व हिताहित सर्व प्रकार भगवंताचें पायांकडे अर्पल्यामुळें निश्चिंत

ईश्वराचें सोंपणें ही खरी अर्पणभक्ति होय. ' मत्कर्मपरमो भव ' असें भगवंतांनीं गीतेंत सांगितलेंच आहे. भगवदर्पणबुद्धीनें सर्व कर्में करणें, व भगवंताला पळभर न विसरणें, व विस्मरण होतांच हळहळ वाटणें, असें भक्ताचें लक्षण नारदांनीं सांगितलें आहे व त्याला ' व्रजगोपिकानाम् ' ( सूत्र २१ ) असें नंदगोकुळांतल्या गोपींचें उदाहरण दिलें आहे. गोपी भगवंताचें माहात्म्य पळभरही विसरल्या नाहींत. गोपींना जारिणी ह्मणणारे लोक एक ठळक गोष्ट विसरतात. जारिणींचें प्रेम अल्प काळांतच नाश पावतें. आपल्या प्रियतमाच्या सुखानें आपण सुखी होणें ( तत्सुखसुखित्वम् ) असें आत्मनिरपेक्ष प्रेम गोपींचें होतें, हें जारिणींना कोठून माहित असणार ! श्रीकृष्णप्रेमानें वेड्या झालेल्या गोपी आपल्यांसही विसरत असत ! देह, धन, सुत, पति, व आपलें सर्वस्व त्यांनीं भगवंतास अर्पण केलें होतें ! भक्तांत उत्तम भक्त ह्मणजे गोपीच होत. नारदांनाही जर गोपींशिवाय दुसरें उदाहरण आठवलें नाहीं, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. कबीर-नामदेवासारख्या मोठमोठ्या भक्तोत्तमांनीं गोपींच्या प्रेमाचें कौतुकच केलें आहे. काशीस कबीरामागें एकदा शेंकडों भाविक लोक त्यांच्या रामभक्तीची प्रशंसा गात चालले होते तेव्हां, कबीर परत वळून त्यांना उद्देशून अंमळ रागानें ह्मणाले:—

## दोहा.

कबीर कबीर क्यां कहे ! जा जमुनाके तीर !।
एक गोपिके प्रेममे । बहे गये कोटि कबीर !॥ १ ॥

याचा अर्थ:—' कबीर कबीर काय वेडचाळ करतां ! यमुनेच्या तीरावर जा. अरे वेड्यांनो ! एका गोपीच्या प्रेमांत एक कोट कबीर वाहून जातील !

अशी ही भक्ति कर्म, ज्ञान व योग याहून श्रेष्ठ आहे ( सूत्र २५ ) कारण कीं भक्ति हें त्यांचें फळ आहे ( सूत्र २६ ). ज्ञान हें भक्तीचें साधन आहे असें कित्येक आचार्यांचें मत आहे ( सूत्र २८ ), ज्ञान व भक्ति दोघांत अन्योन्या-

श्रेय आहे असें कांहींचें मत आहे ( सूत्र २९ ) पण भक्ति स्वतःच फलरूपिणी आहे, ह्मणजे राजा चांगला आहे असें ह्मणून भागत नाहीं, तर सेवा करून त्याला संतुष्ट करावें लागतें किंवा भोज्य पदार्थांच्या ज्ञानमात्रें करून तृप्ति होत नाहीं, स्वयंपाकादि करून क्षुधा शांत करावी लागते, त्याप्रमाणेंच भक्तीचेंही आहे असें नारदांचें सांगणें आहे ( सूत्रें ३०-३२ ). इतर सर्व साधनांपेक्षां भक्ति हें ईश्वरप्राप्तीचें साधन अगदीं सुलभ असून तिच्यापासून तात्काळ शांति व परमानंद यांची प्राप्ती होते, असें नारदांनीं पुढें ( सूत्रें ५८-६० ) सांगितलें आहे. ' भक्तिरेव गरीयसी ' ( सूत्र ८१ ) हा ह्या ग्रंथांतला मुख्य सिद्धांत आहे व तुकारामादि भक्तांनींही तोच सांगितला आहे.

४ आतां भक्तीचे पोषक व मारक प्रकार कोणकोणते आहेत तें सांगू. पोषक प्रकारांचें ग्रहण व मारक प्रकारांचा त्याग करावा हें कांहीं सांगण्याची जरूर नाहीं. सूत्रें ३५-४२ मध्यें सांगितलें आहे कीं, विषयत्याग सू. संगत्याग करावा, अव्यावृत सू० निरंतर भजन—नामस्मरण करावें, लोकांत सुद्धां भगवद्गुणश्रवणकीर्तन करावें व मुख्यतः महत्कृपा ह्मणजे संत व महानुभाव यांचा प्रसाद जोडावा ह्मणजे भक्तीची सिद्धि होते. देव व भक्त यांच्यांत भेदभाव नाहीं.

तस्मिंस्तज्जने भेदाभावात् ॥ ४१ ॥

म्हणून दुर्लभ, व अमोघ असा सत्संग धरून भगवद्भक्ति साध्य करावी. ' तदेव साध्यताम् तदेव साध्यताम् ' ( सूत्र ४२ ). संत प्रेमपात्र मिळाल्यावर त्यापाशीं मात्र प्रेमरूप प्रकट करितात. ( सूत्र ५३ ).

( अ ) दुःसंगः सर्वथैव त्याज्यः ॥ ४३ ॥

( आ ) स्त्रीधननास्तिकचरित्रं न श्रवणीयम् ॥ ६३ ॥

( इ ) वादो नावलम्ब्यः ॥ ७४ ॥

ह्या तीन सूत्रांत कोणत्या गोष्टींचा त्याग करावा हें सांगितलें आहे. सुद्धां

गांचा संग सर्वथा टाकावा, कारण त्यापासून काम, क्रोध, मोह, स्मृतिभ्रंश, बुद्धिनाश व सर्वनाश ही अनर्थपरंपरा निश्चयानें ओढवते ! ( सूत्र ७४ ) काम-क्रोधादि दुर्गुण हे जरी तरंगासारखे लहान असले तरी दुष्टसंगाच्या महिम्यानें समुद्रासारखे दुस्तर होतात. ( सूत्र ७५ ) दुष्टसंगति धरूं नये, तसेंच स्त्री, धन व नास्तिक यांचें गुणवर्णन किंवा चरित्रगायन करूं नये व ऐकूंही नये, कारण त्यापासून चित्ताला विक्षेप होतो. भक्तिपंथानें जाणाऱ्यानें वादांतही पडूं नये. वादापासून बिलकूल फायदा नाहीं. वाद ही अहंकाराची कन्या आहे. उभय पक्ष अभिमानामुळें हट्टास पेटतात, पर्वलीवर येतात, परस्परावर गालिप्रदान करितात व शोत्यांचाचकांस फसवून आपल्याला अधोगतीस नेऊन पोंचवितात ! समर्थही मनोबोधांत ह्मणतात—

जनीं सज्जनीं वाद हा वाढवावा । पुढें मागुती शोक जीवीं धरावा ।
निजध्यास तो सर्व तुटोनि गेला । बळें अंतरीं शोकसंताप ठेला ६२

वादाची प्रीति भगवत्प्रीतीला अवरोध करणारी आहे म्हणून वादाच्या फंद्यांत पडूं नये. भक्तिभावाचें संगोपन करण्यासाठीं—

भक्तिशास्त्राणि मननीयानि तदुद्बोधककर्माणि करणीयानि ॥ ७६ ॥

ज्या शास्त्रांतून भक्तीचें उपपादन केलें आहे अशा शास्त्रांचें मनन करावें, आणि भक्तिभावाचें उद्दीपन करणारीं सत्कर्मे आचरावीत. गीताभागवतादि ग्रंथांचें नित्य परिशीलन ठेवावें व स्नानदानजपतपपूजानुष्ठानादि कर्में करावींत. अहिंसा, सत्य, शौच, दया, आस्तिक्य आदिकरून जीं सच्चरित्रें आहेत त्यांचें पालन करावें ( सूत्र ७८ ) राष्ट्रावर आपत्ति कोसळली किंवा लोकांवर संकटें आलीं तरी लोकव्यवहारानुरूप उचित आणि अवश्यंभावि कर्मे करावींत पण भगवत्प्रेम लवमात्र ढळूं देऊं नये.

लोकहानौ चिंता न कार्या निवेदितात्मलोकवेदत्वात् ॥ ६१ ॥

लोकांचा नाश होत आहे हें पाहून खेद करीत बसूं नये. कारण आपला देह,

सर्व. लोक आणि वेद ह्यांचा ईश्वराच्या ठायीं समर्पण करणें व भगवत्स्वरूप होऊन राहणें हें भक्ताचें आत्मकर्तव्य आहे. जग परमेश्वराचें आहे. प्रत्येक व्यक्तीची व राष्ट्राची वरी कर्तव्यकर्में पाहून तो त्यांच्या त्यांच्या सुखदुःखानुरूपच फळें त्यांना त्यांनंतर देत असतो. सुजनप्रतिपालन व दुष्टविनाश हीं ईश्वराचीं कार्में ईश्वर करीत असतो. ' साधूंचें तो परित्राण करितो. ' तर आपण साधु होण्याच्या मार्गास लागणें एवढेंच आपल्याकडे येतें. आपण भगवद्भक्त झालों म्हणजे आपलें सर्वप्रकारें संगोपन करण्याचें काम तो करितो. भक्तांना सर्व आपत्तींपासून राखणें व दुष्टांना शासन करणें हें भगवंताचें जर ब्रीद आहे, तर आपण भक्त होऊन परमेश्वराला आळवून आपलेंसें करून घेणें हें आपल्याकडेच येत नाहीं काय !

स कीर्त्यमानः शीघ्रमेवाविर्भवति अनुभावयति भक्तान् ॥ ८० ॥

' भगवंत हा कीर्तनानें, नामस्मरणानें, भजनानें प्रसन्न होऊन तत्कालच प्रकट होतो, व आपल्या भक्तांचीं सर्व संकटें दूर करून त्यांना प्रेमानंदानें सर्वथा सुखी करितो.

५ भक्तीचें माहात्म्य ह्याप्रमाणें जनजल्पनिर्भय म्हणजे कुत्सित लोकांच्या टीकेला न भिणारे असे जे कुमार, व्यास, शुक, शांडिल्य, गर्ग, विष्णु, कौंडिन्य, शेष, उद्धव, आरुणी, बलि, हनुमान्, बिभीषण इत्यादि अनेक भगवद्भक्तांनीं वर्णिलें आहे; म्हणून नारद म्हणतात कीं इतर फंदांत न पडतां मुक्त होण्याची इच्छा करणाऱ्या सर्वांनीं ह्या भक्तीचाच आश्रय करावा म्हणजे ते सर्व सुखानंदमय पावतील:—

सैव ग्राह्या मुमुक्षुभिः ॥ २१ ॥

—सर्ग २ श्लोक ३४

मनोगतिं न विसृजेत् जितप्राणो जितेंद्रियः ।
सत्त्वसंपन्नया बुद्ध्या मन आत्मवशं नयेत् ॥ २० ॥

अर्थ—धारण करितांना मन चटकन् भ्रमण करूं लागेल, विषयांकडे धांवेल व चंचल होईल; म्हणून सावधपणें जागृत राहून त्या मनाच्या थोडें अनुरोधानें म्ह० कलानें घेऊन नंतर त्यावर आपलें लोगीर ठेवावें। मनाचा मार्ग सोडूं नकोस, त्याचा सारखा पिच्छा पुरीव. मन कोठें कोठें भटकतें तें सावधपणें पहात जा, बुद्धि सत्वसंपन्न करून मनाला कह्यांत ठेव. मन चंचल व अनावर आहे, विषयाकडे ओढ घेतें म्हणून वर सांगितलें खरें पण या मनाचा एक मोठा सद्गुण आहे. त्याला जिकडे वळवावें तिकडे जातें. ज्ञानेश्वर म्हणतातः—

परि या मनाचें एक निकें । जे देखिलिया गोडीचिया ठाया सोके ।
म्हणोनि अनुभवसुखचि कवतिकें । दावीत जाईजे ॥ १ ॥

पाण्याचा प्रवाह वळवावा तिकडे वळतो. मन हें पाण्याच्या पाटासारखें आहे. त्याला विषयाची चटक तरी कां लागली ? तोच अभ्यास त्याला करूं दिला म्हणून. तसाच परमार्थाचा, भगवच्चिंतनाचा ध्यास लावला म्हणजे लागतां लागतां तोच गुण घेऊन मन उठेल. भागवताच्या ११ व्या स्कंधाच्या १४ व्या अध्यायांत व्यासांनीं स्पष्ट सांगितलें आहेः—

विषयान्ध्यायतश्चित्तं विषयेषु विषज्जते ।
मामनुस्मरतश्चित्तं मय्येव प्रविलीयते ! ॥ २० ॥

भगवंतांनीं गीतेंतही सांगितलें आहेः—

यतो यतो निश्चरति मनश्चंचलमस्थिरम् ।
ततस्ततो नियम्यैतत् आत्मन्येव वशं नयेत् ॥ ६ ॥

मुखानें नेहमीं भगवन्नाम गावें, हृदयानें भगवत्स्वरूप चिंतावें, कानानें भगवद्गुण

ऐकावे; पायांनीं भगवंताच्या प्राप्तीसाठीं चालावें; हातांनीं भगवंतांची व संतांची सेवा करावी; डोकें देवापुढें व संतांपुढें वाकवावें; हृदयांत विषयाला ठाव देऊं नये; सर्व जागा परमेश्वराच्या परमप्रीतीनें व्यापून टाकावी; डोळ्यांनीं भगवंताला पाहावें; फार काय पण सर्व संकल्प भगवत्पर करावेत; जागृतींत-स्वप्नांत, घरीं-दारीं सर्वकाळ भगवंताला नामसूत्रानें हृदयाशीं दृढ आवळून टाकावें. भगवंताच्या नामाचा महिमा लहान समजूं नका. दासीपुत्राचा नारद झाला. नामासाठीं आमचा जन्म अमृतरूप झाला, " तुका म्हणे रामनामीं ! कृतकृत्य झालों आम्ही, " असे तुकोबासारख्यांचे टसटसीत उद्गार आहेत. म्हणून ' मुखीं नाम, हातीं मोक्ष । ऐसी साक्ष बहुतांसी ' या तुकोक्तीवर पूर्ण विश्वास ठेऊन अहर्निश मनाला नामाचा छंद लावून घ्यावा. म्हणजे अवघी काया गोविंदरूप होते. क्षुद्र विषयांचीं दिवाभीतें नामधारकाच्या वाऱ्यालाही उभीं राहत नाहीत. विषयांच्या नादीं लागलें तर मन कुत्र्याचें सहोदर बनतें, पण त्याला नामाचें भक्त बनविलें तर अमृताचा चारा खाणारें तेंच हंस बनतें. कोणीहि व्यसनासक्तानें विषयांना भिऊं नये. मागें झालें तें सर्व माफ.

आतां तरी पुढें हाचि उपदेश । नका करूं नाश आयुष्याचा ॥ १ ॥

तुकाराममहाराजांनीं आपल्या मनाला हंसाची उपमा देऊन म्हटलें आहे:—

हरिनामवेली पावली विस्तार । फळीं पुष्पीं भार वोल्हावली ॥ १ ॥
तेथें माझ्या मना ! होई पक्षिराज । साधावया काज तृप्तीचें या ॥ २ ॥
मुळीचिया बीजें दाखविली गोडी । लाहो करी जोडी जालियाची ॥ ३ ॥
तुका म्हणे क्षणक्षणा जातो काळ । गोडी ते रसाळ अंतरेल ॥ ४ ॥

यंदाच्या विजयादशमीच्या मुहूर्तावर जर विषयांनीं घालून दिलेल्या सीमेचें उल्लंघन करावयाचा आम्ही निश्चय केला तर ऐहिक—पारमार्थिक, व्यक्तिक—राष्ट्रीय

सर्व व्यसनांपासून आम्ही मुक्त होऊन स्वस्वरूपधामींचें सोनें लुटूं आणि साम्राज्यपटावर अधिष्ठित होऊं यांत तिळमात्र शंका नाहीं. आपण सर्वच विषयसीमेचें उल्लंघन करूं या, रामनामाचे बाण हातीं घेऊन मोक्षगड घेण्या-साठीं विठ्ठलाचे गाढे वीर होऊं या, म्हणजे आपल्या जन्माचें सोनें होईल, इतकेंच काय पण सर्व पिंडाचें लोहपण नाहींसें होऊन तें सर्व स्वर्णमय होईल. नामधारकाला आजवर कधींही व कोठेंही अपशय आलें नाहीं. दशेंद्रियें भगवंताला जो अर्पण करील त्याचीच जगांत नित्य फत्ते होईल !

---

# ११ संक्रांतीच्या हलव्याचे दाणे.

१ सुख पाहतां जवापाडें । दुःख पर्वताएवढें ही तुकाराममहाराजांची उक्ति मननीय आहे. सुख हें पुण्याचें फळ आहे, व दुःख हें पापाचें फळ आहे. ह्या जगांत पुण्यापेक्षां पाप कोटपटीनें ज्यास्त घडत असल्यामुळें सुखदुःखांचें प्रमाण मेरुसर्षपन्यायानें विलक्षण सांपडतें.

२ याशिवाय आणखी एक विचार आहे. लोक पापबीजाची जोपासना ज्या रीतीनें करितात तशी पुण्यबीजाची करीत नाहींत. शेतकरी शेतांत दाणे पेरून त्यावर माती पसरून टाकतो तेव्हांच ते दाणे अंकूर धारितात. दाणे उघडे टाकले तर ते चिमण्याकावळे खाऊन टाकतात. लोक मोहरीएवढें पुण्य केलें तरी तें उघड करितात, पण पर्वताएवढें पाप केलें तरी तें झांकून ठेवतात ! अर्थात् उघड केलेलें आणि तेंही अत्यल्प असलेलें पुण्य उडून जातें व झां-कून ठेवलेलें व तेंही पर्वताकार असलेलें पाप मोड घेऊन उठतें व त्याचा प्रचंड वृक्ष बनतो ! !

३ दृष्टांताला भूमि व सिंचन लागत असतें. पापरूप दाणे आपण खोल अं-तःकरणभूमींत पेरून त्याला मननाचें सिंचन देत असतों त्यामुळें ते मोड फु-टितात'। खोल खोल मनांत पाप प्रच्छन्न ( झांकून ) ठेवण्याची मनुष्यमात्राची प्रवृत्ति असते. ही प्रवृत्ति अहंभावापासून उत्पन्न झालेली असते.

४ खरे मुमुक्षु हृदयांत पाप झांकून ठेवीत नाहींत. आपण पुण्यवंत व शुद्धम-नस्क आहोंत असें जगाला नुस्तें भासवण्याची सर्व लोक धडपड करितात, पण 'पतित मी पापी शरण आलों तुज । राखीं माझी लाज पांडुरंगा' असें पांडुरंगापा-शीं मोकळेपणानें बोलण्याची तुकारामासारख्याची तयारी असते ! पुष्कळ लोक आपल्या इंद्रियनिग्रहाची थोरवी गात असतात, पण,

माझे मज कळों येती अवगुण । काय करूं मन अनावर ॥ १
वाचा वदे परी करणें कठीण । इंद्रियां आधीन झालों देवा ॥ २

अशाप्रकारें तुकारामासारखे सत्यनिष्ठ पुरुष स्पष्ट देवाच्या तोंडावर बोलतात !

५ आणि पापपुण्य म्हणजे तरी काय ? सत्य हेंच पुण्य व असत्य हेंच पाप. ब्रम्ह हें सत्यस्वरूप असल्यामुळें अखंड ब्रह्मचिंतन हें खरें पुण्य व मायेचे सर्व व्यवहार हें पाप. समर्थ सांगतात:-

सत्याएवढें सुकृत नाहीं । असत्याएवढें पाप नाहीं ।
प्रचीतीवीण कोठेंच नाहीं । समाधान ॥ ५ ॥
सत्य ह्मणजे स्वरूप जाण । असत्य माया हें प्रमाण ।
येथें निरोपिलें पापपुण्य । रूपें सहित ॥ ५५ ॥
द्वैत पाप वोसरलें । पुण्य परब्रह्म उरलें ।
अनन्य होतांच उरलें । नामातीत ॥ २ ॥

दासबोध द. १४ स. १०.

असत्य हें पाप व सत्य हें पुण्य. [illegible] असावें तर्री [illegible]

णाची व. पुण्याची. आपण जसें असावेंसें आपणास वाटतें तसेंच जगाला दिसावें ही बुद्धि खोटी व. पापाची. म्हणूनच जगांत सत्यनिष्ठा कमी व० पुण्य कमी, अर्थात सौख्यही कमी, म्हणून तुकोबारायांची ' सुख पाहतां इ. ' उक्ति सर्वथैव खरी आहे.

७ पुण्य झांकून ठेवण्याची बुद्धि पाहिजे. पुण्य झांकिलें तरच तें अंतःकरणांत मोड धरील. म्हणूनच ज्ञानेश्वर म्हणतातः—

> नाना कृषीवळ आपुलें। पांघुरवी पेरिलें।
> तैसें झांकी निपजलें। दानपुण्य! ॥ ज्ञा० अ. १३–२०७॥

८ गीतेच्या ११ व्या अध्यायांत विश्वरूपदर्शनाची जी पुण्यकथा आहे तिचें तात्पर्य 'मत्स्थानि सर्वभूतानि न चाहं तेष्ववस्थितः' ह्या श्लोकार्धांत आहे. सर्व सृष्टि परमात्म्याच्या ठायीं आहे हें पाहण्यास श्रीकृष्णानें पार्थास शिकविलें. 'विष्णुमय जग पाहणें' हाच वैष्णवधर्म होय.

९ शिष्य आणि गुरु यांमध्यें भेद आहे असें ज्यास वाटतें तो गुरु नव्हे व गुरु आणि देव यांत भेद आहे असें ज्यास वाटतें तो शिष्य नव्हे!! देव, गुरु आणि सच्छिष्य हे तत्त्वतः एकच आहेत.

१० दूध ही अमोलिक वस्तु आहे व गवळण ' दूध घ्या दूध ' असें रस्त्यानें जरी ओरडत जाते तरी ज्याला त्याची गरज आहे तोच तें विकत घेतो! त्याचप्रमाणें वेदांतशास्त्रांतलीं रहस्यें जगाला फुकट देण्यासाठीं जरी तुकारामासारख्या वाण्यानें मोफत दुकान काढलें आहे, तरी परमार्थाची ज्याला तहान लागली असेल, तोच त्या दुकानापाशीं जाईल!

११ भूतांची दया अंतःकरणांत अनिवार उत्पन्न झाल्यामुळेंच प्रत्युपकाराची अपेक्षा न करितां व वेळीं छळ अपेक्षा व हाल सोसूनही ' विषयविष न पितां कथामृताकडे वळा ' असेंच जीवाला संत सांगत असतात.

१२ पशुपक्षी ज्वालामुखीजवळ जात नाहींत, त्याप्रमाणें सुखदुःखादि द्वंद्वें ज्ञानाग्नीनें देदीप्यमान् झालेल्या महात्म्याजवळ जाऊं शकत नाहींत.

१३ निंबाच्या मुळींत सुद्धां ज्ञाते पुरुष केवळ अर्थ शोधून काढतात! संक्रांतीसारख्या पर्वणींच्या प्रसंगीं लोक समुद्रस्नानास—चित्तशुद्धीसाठीं जातात हें लक्षांत आणून पंत गीतास्तुतिप्रसंगीं म्हणतात:—

मी तों अगाध गीतासुधानदीमाजि मारितोंचि उडी ।

नरजन्मपर्व दुर्लभ जाणुनि घ्यावी कशी न येथ बुडी ! ॥

नरजन्मप्राप्ति हीच महापर्वणी आहे व या पर्वणीची संधी साधून जीवानें जर गीतासुधानदींत उडी मारली तर त्रिविधतापाची लहर मरून जाऊन व जीवाचा जीवपणाचा विटाळ जाऊन तो मुक्तत्वाचा सुखसोहळा भोगील.

१४ आत्मा हा महासागर आहे व हस्तपादादि अवयव हे त्यावर तरंगणारे बर्फाचे तुकडे आहेत, पण ज्ञानसूर्याचा उदय होतांच ते आत्मसागरांत विरघळून जातात व त्यांचें नामरूपादि नष्ट होतें.

१५ सच्छिष्यानें सद्गुरूला जी गुरुदक्षिणा द्यावयाची असते ती नित्यानित्य-विवेकादि साधनचतुष्टयानें पवित्र झालेली हृदयभूमि हीच होय !

१६ श्रोत्यांनीं अधिकारसंपन्न वक्त्याला जी दक्षिणा द्यावयाची असते ती 'एकलें अवधान' होय ! ज्ञानोबाराय आपल्या श्रोत्यांना विनवितात:—

एकलें अवधान दीजे । मग सर्व सुखांसी पात्र होईजे ।

हें प्रतिज्ञोत्तर माझें । उघड आइका ॥ १ ॥

१७ लटकें कोणतें व सत्य कोणतें हें गुरु शिष्याला सांगत असतात. सत् वस्तूचा भास आहे हेंच पार्थाला श्रीकृष्णानें सांगितलें:—

विचारितां निरसलें । तें प्रपंच सहजें सांडविलें ।

मग तत्त्वता तत्त्व उरलें । ज्ञानियांसी ॥ ज्ञा० २—१२१

१८ हिरा उकिरड्यांत पडून मळला तरी तो मळ झाडून टाकतांच त्याचें स्वयंसिद्ध तेज प्रकट होतें, त्याप्रमाणें मनावरचे वासनेचे मलिन संस्कार

म्हणून ज्ञानांत आत्मस्वरूपाची प्रभा व्यक्त होते. वासनेचे संस्कार गळून पडल्या-वरच चित्तास चैतन्य येतें.

१९ सपाट जमीनीवरून चालतांनाही आंधळा प्रतिपदीं धडपडत होऊन चा-चरतो, त्याप्रमाणें अज्ञ जीव लहान लहान प्रसंगानें सुद्धां गांगरून जातो ! अ-ज्ञान म्हणजे अविद्या होय व खरें आंधळेपण म्हणजे अज्ञानच होय !

२० ज्ञानी मनुष्याची गोष्ट कांहीं निराळी आहे. "अन्नआच्छादन। हें तों प्रार-ब्धा आधीन," हें त्यास पक्कें माहीत असल्यामुळें व प्राक्कर्मांचीं फळें भोगल्या-शिवाय कोणालाही सुटका नाहीं हें त्याच्या मनावर ठसलें असल्यामुळें तो सु-खदुःखें समाधानवृत्तीनें सोसतो. रंगनाथ स्वामींनीं म्हटलें आहेः—

जाळिलें संचित समुळीं ज्ञानाग्नीमाजी निगुती ।
क्रियमाण पूर्वप्रवाहें विधिपूर्वक कर्में घडती ॥ १ ॥
निर्हेतुक निरहंकारें ब्रह्मार्पण सहजचि होती ।
प्रारब्ध कलेवर भोगी साक्षी हा ईश्वरमूर्ती ॥ २ ॥

२१ श्रुतिस्मृतिपुराणेतिहासादि ग्रंथ ही भवसागरांतून तारून नेणारी नौका आहे व सद्गुरु हे नाविक आहेत. श्रुतिस्मृतींचा अर्थ गुरुमुखानें व सांप्रदायपरंपरेनेंच श्रवण केला पाहिजे.

२२ वाचन आणि श्रवण यांत महदंतर आहे. केवळ आपल्या बुद्धिमत्तेच्या जोरावर ग्रंथगर्भ आपणास सांपडेल अशी कोणीही घमेंड मारूं नये. श्रवण, मनन, निदिध्यासन ह्याच आत्मसाक्षात्काराच्या तीन पायऱ्या आहेत.

२३ माझ्या ७ वर्षांच्या शांतानामक मुलीला मी एकदां कांहीं खायचा पदार्थ देऊं लागलों, पण ती हात पुढें न करितां म्हणाली—" मला नको. तें काय आहे कोण जाणे ! बाबा ! तूं तें खाऊन गोड आहे कीं नाहीं तें मला सांग म्हणजे मी खाईन ! " शांतीचें तें भाषण ऐकतांच मी चकित झालों. सद्गु

तरी यापेक्षा दुसरें काय करितो ! महात्म्यानें मधुरफळ आपण स्वतः खाऊन तृप्त झाल्यावरच तो तें शिष्याच्या हातीं देतो ! मीं मोठ्या कष्टानें शांतीचें मूळ घेतलें पण शांतीनें मला एका उदात्त तत्त्वाचें स्मरण दिलें याबद्दल मी मला त्यावेळीं कृतकृत्य वाटली !

२४ जग जगदीश्वराची छाया आहे.

२५ सत्संग म्हणजे केवळ भल्यांचा संग नव्हे, कारण भल्याभल्यांत सुद्धां पुष्कळ वेळां तीव्र मतभेद होतो. भलीं माणसें सुद्धां कालवश आहेत. खरा सत्संग म्हणजे सत् वस्तूचा संग होय. हा संग एकदां घडला म्हणजे बिघडणारा नाहीं. ! जीवाचा खरा मित्र म्हणजे आत्माराम हाच होय. त्याला रोग, मृत्यु, लोभ, चंचलता इत्यादि विकारांची भीति नाहीं. मना ! या आत्मारामाचा संग कर!—

मना संग हा सर्व संगासि तोडी । मना संग हा मोक्ष तात्काळ जोडी ॥

—श्रीरामदास

२६ प्रपंच व परमार्थ हीं दोन्ही ज्याला साधतां येतात त्यालाच उभयलोकांतलीं बहुविध सुखें अनुभवायला सांपडतात. महापुरुषाचें लक्षण समर्थ असें देतात:—

प्रपंचीं जाणे राजकारण । परमार्थीं साकल्याविवरण ॥
सर्वांमध्यें उत्तम गुण । त्याचा भोक्ता ॥ १ ॥

२७ कोणतेंही फळ कालक्रमानुसार परिपक्वतेस येतें; योग्यकालापूर्वी कांहीं केलें तरी तें पूर्णतेस येत नाहीं. त्याप्रमाणें प्रत्येकाला स्वतःच्या परिश्रमानें, स्व० विवेकानेंच महापदप्राप्ति करून घ्यावी लागते; दुसऱ्याचे परिश्रम त्याच्या उपयोगीं पडत नाहींत:—

सांगावें कोणें कोणा चिंता आपुली आपणा ।
दुःखें या संसाराच्या शरण जावें नारायणा ॥ १ ॥

—रामदास.

२८ परिपक्व झालेल्या फळांमध्यें पाडाला आलेलें फळ ठेवलें तर त्यांच्या संगतीनें तें लवकर परिपक्व होतें, त्याप्रमाणें साधकांच्या संगतीनें मुमुक्षु साधकावस्थेला जाऊन लवकर पोंचतो ।

२९ नित्यनेमाचा प्रघात सुटों देणें ही धर्मदृष्ट्या अत्यंत मोठी हानि आहे. लहर येईल तेव्हां वाचावें, मनास येईल तेव्हां पूजन करावें, तब्येत लागेल तेव्हां धर्मकर्म करावें ह्या ' मनःपूतं समाचरेत् ' च्या आज्ञेचा मार्ग अनर्थावह आहे. नित्यनेमाचें महत्व समर्थ वर्णितात:—

नित्यनेम दृढचित्तीं । तेणें शुद्ध चित्तवृत्ति ॥
होवोनिया भगवंतीं । मार्ग फुटे ॥ १ ॥
एकाग्र करूनियां मन । अंतरीं करावें ध्यान ॥
सर्व सांग पूजाविधान । प्रत्यहीं कीजे ॥ २ ॥

३० मनुष्याच्या ठिकाणीं घरादारांविषयीं विलक्षण प्रेम असतें व साडेतीन हाताच्या देहावर आपलेपणाचा मोठा अभिमान असतो. गेहावर व देहावर प्रेम ठेवा असेंच साधुसंत सांगतात, मात्र गेहदेहांची व्यापकता वाढवा असें त्यांचें सांगणें असतें. विश्वाएवढें आपलें सत्तेचें घर व चराचराएवढा आपला देह असतांना आपण कल्पनेच्या दुःसंगानें व्यर्थ दारिद्र्य कां भोगावें ? ज्ञानोबाराय ह्मणतात:—

हें विश्वचि माझें घर । ऐसी मती जयाची स्थिर ॥
किंबहुना चराचर । आपण जाहला ! ॥ १ ॥

---

# १२ ईश्वरविषयक संवाद.

---

## लेखांक १.

गेल्या कोजागिरी पूर्णिमेच्या दिवशीं मध्यरात्रीच्या सुमारास चिंचवडक्षेत्रीं श्रीमोरयागोसावी यांचें दर्शन घेऊन नजीकच्या रम्य घांटावर मी एकटाच आपल्याशीं विचार करीत बसलों होतों. "भगवान् शंकर ह्या वेळीं संचार करीत करीत जर ह्या गांवीं 'को जागर्ति' म्हणजे 'जागा कोण आहे' असा शोध घेण्यास आले असले तर त्यांना येथें कोणी जागृत मनुष्य भेटेल काय? गांवांत दोन चार ठिकाणीं जागरण करणाऱ्या लोकांचे अड्डे आहेत. पत्ते व सोंगट्या खेळण्यांत, हुतुतु घालण्यांत, आरडाओरड करण्यांत, वायफळ गप्पा बोलण्यांत व निर्जीव थट्टामस्करी करण्यांत कांहीं लोक गुंग झाले आहेत, हे लोक आणखी कांहीं वेळानें चहाचे पेले, कॉफीच्या कपा व दुधाच्या तपेल्या रिचवून पहाटे घाटावर स्नानाला येतील, पण हे जागृत आहेत काय? उपनिषदांनीं 'जागृत रे जनाः उत्तिष्ठत, जागृत, प्राप्यवरान्निबोधत' असा जो उपदेश केला आहे त्याप्रमाणें हे लोक खरे जागृत आहेत काय? आपण कोण आहोंत, व कोठें जाणार याची यांना ओळख आहे काय? ह्या रात्रीं जागे राहण्याचा ज्यानें प्रघात पाडला त्या महात्म्याचें लोकांनीं जागरण करून चहाचे पेले रिचवावेत एवढेंच 'अंतिम साध्य' होतें काय? कोजागिरी पूर्णिमेला मध्यरात्रीं सभोंवार निरभ्र चंद्रप्रकाश पडला असतांना अशा शांत वेळीं मनुष्यानें एकटें बसून स्वस्वरूपाचा शोध घ्यावा; मायामोहाच्या घोर निद्रेंतून जागे होऊन आपला आपण शोध घ्यावा:—

ठायींच बैसोनि करा एक चित्त। आवडी अनंत आळवावा ॥ १ ॥

अशा प्रकारच्या जागृतपणांत वेळ घालवावा हें योग्य नव्हे काय? पण

अशी अवस्था आज ह्या चिंचवड क्षेत्राची नाहीं व महाराष्ट्रांतील कोणत्या शहराची आहे ! सर्वत्र सारखाच अंधार ! कांहीं लोक सोंगट्या खेळण्यासाठीं जागणार, व बाकीचा तमाम लोकसमुदाय स्वस्थ घोरणार ! आपल्या धार्मिक संस्था किती उदात्त हेतूनें स्थापन झाल्या आहेत ! पण लोकांना नुसती कवाईत करावयाचीच संवय झाली आहे. नास्तिकांना धर्म नको, व आस्तिक म्हणविणाऱ्यांना नुसत्या कवायतींत तृप्त राहण्याची संवय झाली आहे ! सर्व धर्मसंस्था, पर्वें, व उत्सव ह्यांचा हेतु मनुष्यांना ' जागृत ' करण्याचा असतो, पण जागृत होण्याची धडपड कोठें आहे ! देवानें नरतनुसारखा कल्पवृक्ष जोडला असतांना त्याच्या छायेखालीं राहून विषयांच्या घाणींत डोकें खुपसण्याची दुर्बुद्धि मनुष्याला कां व्हावी ! हातचा चिंतामणी सोडून कवड्या गोळा करायची बुद्धि होणें हें केवढें दुर्भाग्य ! देव हृदयांत जवळच असतांना त्याचा शोध न घेतां इतर लाख वस्तु मिळविल्या तरी त्यांचा तत्वतः काय उपयोग ! स्वस्वरूपाच्या ठिकाणीं जागृत झालेला किंवा जागृत होण्याची धडपड करणारा असा कोणी नाहीं काय ! " असे विचार मनांत येतांच मागून कोणी धक्का दिल्यासारखें होऊन शेजारीच असलेल्या मोरयागोसाव्यांचें मला स्मरण झालें ! त्या महासिद्धाच्या स्मरणाबरोबर चित्ताला एकदम् आनंद झाला. चिंचवडास भगवान् शंकर आतांच आले व ' को जागर्ति ' म्हणून जर प्रश्न केला तर त्याला उत्तर देण्यास हा महात्मा समर्थ आहे असें मनांत आलें. मोरया गोसाव्यांनीं शके १४७० मध्यें जिवंत समाध घेतली होती ! हा पुरुष ' जागा ' खरा. ही कल्पना सुचतांच श्रीगीतेंतला श्लोक आठवला.

> या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी ।
>
> यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ॥ २—६९ ॥

स्वस्वरूपाच्या ठिकाणीं सर्व जीव निजलेले असतात पण मुनीश्वर जागृत असतो

विषयांच्याकडे सर्व जीव जागृत असतात व तेथें हा निजलेला असतो ! मुनी-श्वराला मिथ्यासृष्टीचें भान नाहीं व विषयी जिवाला स्वस्वरूपाची जागृति नाहीं ! ज्ञानी पुरुष निरंतर भगवत्पर असतो व अज्ञानी पुरुष अखंड विषयांच्या ध्यानांत रमलेला असतो ! वरील श्लोकाचा ज्ञानेश्वरमहाराजांनी भावार्थ सांगितला आहे तो असा:—

> देखे भूतजात निदेले । तेथेंचि जया पाहलें ।
> आणि जीव जेथ चेइले । तेथ निद्रित जो ॥ १ ॥
> तोचि तो निरूपाधि । अर्जुना तो स्थिरबुद्धि ।
> तोचि जाणे निरवधि । मुनीश्वर ॥ २ ॥

मोरया गोसाव्यांचें चरित्र आठवतांच माझें हृदय सद्गदित झालें व ' धन्य धन्य ते संत की ज्यांनीं सर्व उपाधि सोडून परमात्म्याला ओळखलें ! ' असा उद्गार माझ्या तोंडून निघाला. परमेश्वर व संत दोन नाहींत, दोघांचें स्वरूप एकच ! सर्व संतांचें स्वरूप एकच होय ! क्षणभर त्या स्वरूपाच्या चिंतनांत मन गुंग झालें असतां बाह्य सृष्टीचा मला पूर्ण विसर पडला व किंचित्काळ निरुपाधिक प्रेमसुखांत मी पार बुडून गेलों ! असा कांहीं काळ गेला तों माझा एक पुणेकर मित्र तेथें प्राप्त झाला. माझी वृत्ति पाहून माझ्या या मित्रास सानंदाश्चर्य वाटलें व त्याचा आणि माझा संवाद सुरू झाला.

मित्र:—तूं कांहींही म्हण, पण ईश्वर अतर्क्य व अज्ञेय आहे, म्हणून आपण ईश्वराच्या गोष्टीच बोलायचें सोडून दिलें पाहिजे ! ज्याबद्दल आपल्याला कांहीं कळणेंच शक्य नाहीं त्याबद्दल वृथा चर्चा व विचार करीत बसण्यांत काय अर्थ आहे ! खरेंच सांग, ईश्वर आहे अशी तुझी खात्री आहे काय ? ईश्वर म्हणजे काय ?

मी:—ज्याच्या सत्तेला विश्वांत कोणी अवरोध करूं शकत नाहीं, जो

तुमच्या मनोरथांना अवरोध करूं शकतो व जो सर्व जीवांना एका उद्दिष्टाकडे नेतो तोच परमेश्वर होय !

**मित्रः**—ही व्याख्या फारच विलक्षण आहे.

**मीः**— असेल. सर्व मनोरथ सिद्धीस नेण्याची तुझ्यांत शक्ति असती तर मी तुलाच परमेश्वर म्हटलें असतें ! ईश्वर स्वतंत्र व स्वसत्ताक आहे व त्याच्या इच्छेच्या आड कोणीही येऊं शकत नाहीं; म्हणूनच मी त्याला ईश्वर म्हणतों. तुला आपल्या इच्छेप्रमाणें वागतां येत नाहीं, पदोपदीं तुझे मनोरथ भग्न होतात, तूं विश्वांतल्या अनेकांच्या सत्तेखालीं चालतोस म्हणून तुला ईश्वर म्हणतां येत नाहीं.

**मित्रः**—अनेकांची सत्ता म्हणजे जर ईश्वर, तर आमच्या पुणें शहरांतले लोक म्हणतील तें करूं शकतात मग त्यांनाच ईश्वर कां म्हणूं नये ?

**मीः**—पुण्यांतले, नाहीं कलकत्त्यांतले, किंवा लंडनचे लोक घेतलेस तरी म्हटल्यावेळीं त्यांना पाऊस पाडतां येत नाहीं किंवा नको म्हटलें असतां बंद करितां येत नाहीं ! पुण्यांतल्या लोकांना जर स्वसत्तेनें वागतां येते, तर पुण्यास प्लेग कां येता व झोंपड्यांत राहायला त्यांना कां जावें लागतें ! त्यांना प्लेग नको आहे हें तर उघड आहे, त्यांनी प्लेगला एकदम नोटीस दिली असती कीं 'तूं ह्या क्षणीं येथून जा !' पण प्लेगला ऐकायला लावायचें आहे कोणाच्या हातांत ! हैद्राबादेला निजाम सरकार, रेसिडेंट, शेंकडों अमीर उमराव व लाख पन्नास हजार फौज असतांना दोन दिवसांत शहर जलमय होऊन गेलें, व लक्ष मनुष्यें मेली. कोणाच्या ध्यानीं मनीं नसतां असा अकस्मात् प्रळय ओढवला. निजाम सरकारच्या काय मनांत नाहीं आलें कीं, आपलें हें शहर जलमय होऊन जाऊं नये ! निजामच्या व रेसिडेंटाच्या पलीकडे विश्वांत कोणाची तरी सत्ता आहे. सर्वांवर ज्याला सत्ता चालवितां येते तो सर्वशक्तिमान् परमेश्वर होय !

**मित्रः**—इंग्रजांची सत्ता जगावर चालते तर मग ईंग्रजच परमेश्वर होत !

**मीः**—इंग्रजांची सत्ता जर जगावर चालती तर सर्व जगाचा नकाशा त्यांनीं तांबडा करून सोडला असता. फ्रान्स, जर्मनी, रशिया, अमेरिका हीं राष्ट्रें स्वतंत्रपणें त्यांनीं टिकूं दिलीं नसतीं.

**मित्रः**— हिंदुस्थानापुरतें तरी इंग्रजांना ईश्वर मानतां का?

**मीः**—तुह्मी विचारसरणी फारच कोती आहे. इंग्रजांची हिंदुस्थानावर खरी सत्ता असती तर नव्या चळवळीनें तेज त्यांना थांबवितां आलें असतें!! त्यांची सत्ताही अनंतकाल टिकेलच अशी ग्वाही द्यायला कोण तयार आहे? रावणासारख्यांचीं साम्राज्यें गेलीं, ग्रीक, रोमन, मुसलमान इत्यादिकांचीं साम्राज्यें नाहींशीं झालीं. ईश्वर जसा सर्वशक्तिमान् आहे. तसाच तो न्यायी व दयाळूही आहे. काळ्यागोऱ्यांचा भेद इंग्रजांजवळ आहे, ईश्वराजवळ नाहीं. स्वार्थैकपरता इंग्रजांजवळ आहे, समता परमेश्वराजवळ आहे. सर्वशक्तिमत्त्व, समत्व, व दयाळुत्व जर इंग्रजांत असतें तर आह्मीं त्यांनाही ईश्वर ह्मटलें असतें! ईश्वराचा वास गुणांजवळ आहे, देहांजवळ नाहीं. इंग्रज तुह्मांआह्मांसारखेच माणसें आहेत. त्यांचा स्वार्थ ते ओळखतात, आमचा आह्मीं अजून ओळखीत नाहीं. त्यांचा आमचा झगडा स्वार्थास्वार्थामधला आहे. ज्याचें पुण्य ज्यास्त प्रबळ होईल तो दुसऱ्यास जिंकील. इंग्रजांना जन्ममृत्यु आहे, इंग्रजांना सुखदुःख आहे, इंग्रजांना यशापयश आहे, त्यांच्या सत्तेला संकोच–विस्तार आहे, व वृद्धि—नाशही आहे. परमेश्वरी सत्ता सर्वांवर सर्वकाळ सारखी चालते, व त्या सत्तेबरोबर न्याय, समता व दयाळुपण हीं अखंड आहेत. परमेश्वरी सत्तेच्या अनुरोधानें जे चालतात त्यांना यश मिळतें. परमेश्वरी इच्छेच्या ओघाबरोबर जे जातात त्यांना सुख मिळतें. आपण सर्व मर्त्य उपाधिमग्न आहोंत, परमेश्वर निरुपाधिक व सुखरूप आहे. आमच्या इच्छा उपाधींच्या अनुकूलताप्रतिकूलतेप्रमाणें सफळ–निष्फळ होतात, पण ज्याच्या इच्छामात्रेंकरून विश्व चालतें, चंद्रसूर्य व पंचमहाभूतें ज्याच्या आज्ञेनें खेळतात,

लोकाच्या इतरांही ज्याच्या संकल्पाबरोबर स्वतंत्र व अस्वतंत्र, तो सर्वश-क्तिमान्, सर्वज्ञ, सर्वतोमुख दयाळु परमेश्वर मात्र खरा सत्ताधीश आहे, त्याच्या चरणीं माझे अनंतानंत प्रणिपात असोत.

---

[ लेखांक २. ]

मित्रः—ज्याच्या सत्तेला विश्वांत कोणी अवरोध करूं शकत नाहीं, पण ज्याची सत्ता सर्व बाजूंनीं आपल्या मनोरथांना अवरोध करिते तो परमेश्वर होय असें तूं ह्मणालास. अवरोधकत्व हें तुझ्या मतें परमेश्वराचें लक्षण दिसतें. मी आंधळा, दरिद्री व असहाय आहें आणि माझ्या मनांत काशीस असलेल्या एका मित्रास पहावयाचें आलें तर आंधळेपण, दारिद्र्य व असहाय-त्व ही सर्व कारणें माझ्या मित्रदर्शनरूप मनोरथास अवरोध करितात ह्मणून त्यांनाच तुझ्या व्याख्येप्रमाणें परमेश्वर ह्मणावें लागेल !

मिः—तुझ्या बोलण्यांत मोठी चूक आहे. परमेश्वराच्या विविध लक्ष-णांपैकीं अवरोधकत्व ( नियामकत्व ) हें एक आहे.

स = अ + क + ख + य + च + ह. इ. असें समीकरण दिलें ह्मणजे स ह्मणजे अ किंवा ० य असें ह्मणणें चुकीचें होईल. मला ह्यावरून ' अंध आणि हत्ती ' या गोष्टीचें स्मरण होतें. पांच चार आंधळे हत्तीपाशीं आले आणि हत्तीचें वर्णन करूं लागले ! एकाच्या हातीं हत्तीची सोंड आली व हत्ती गदेसारखा आहे असें तो ह्मणूं लागला ! दुसऱ्याच्या हातीं हत्तीचा कान आला व तो तोऱ्यानें पुढें होऊन ह्मणाला, " छे छे ! तूं मह आहेस, हत्ती कसा आहे हें तुला बिलकूल समजलें नाहीं. तें अस्मादिकांनीच जाणलें अरे मूर्खा ! हत्ती सुपासारखा आहे ! ! " तिसऱ्याच्या हातीं हत्तीचें पोट आलें व दोघांनाही मूर्ख ठरवून तो ह्मणाला, ' ह ! हत्तीचें रूप आम्हींच

[illegible]लें. "हत्ती डेऱ्यासारखा आहे!" पांचव्याच्या हातीं हत्तीचा पाय लागला व हत्ती खांबासारखा आहे असें तो म्हणूं लागला!! त्यामध्यें प्रत्येक जण आपलेंच मत खरें व इतरांचें सर्वस्वी खोटें असें प्रतिपादूं लागला व त्या चौघांत शिवीगाळ व मारामार सुरू झाली; इतक्यांत एक डोळस मनुष्य तेथें आला व त्यानें प्रत्येकाच्या मताचा आशय घेऊन सर्वांची समजूत काढली! हत्तीला खांब म्हणणें जितकें मूर्खपणाचें आहे तितकेंच ईश्वराला अवरोधकत्व ह्या एकाच लक्षणानें वर्णूं पाहणें अविचाराचें आहे! तुमचे आईबापही तुमच्या मनोरथांचा अवरोध करतात, बाळपणीं शिक्षक व तरुणपणीं वरिष्ठही तुमच्या मनोरथांना प्रतिबंध करितात, म्हणून ते ईश्वर होत नाहींत. सर्व बाजूंनीं सर्वांना स्वेच्छेप्रमाणें ज्याला अवरोध करितां येतो तोच परमेश्वर होय. तो स्वसत्ताक आहे व अखिल चराचर सृष्टीवर त्याची सत्ता चालते. धुंडिराज कवि प्रल्हादकथेंत म्हणतोः—

भू, जळ, तेज समीर, ख, रविशशिकाष्ठादिकीं असे भरला।
स्थिर चर व्यापुनि अवघा तो परमात्मा दशांगुळें उरला॥ १॥

मित्रः—तुझा हत्तींचा दृष्टांत तुझ्याच गळ्यांत येतो. सर्व हत्ती आपणास एकाच वेळीं दिसत नाहीं. केव्हां त्याची सोंड दिसते, केव्हां कान दिसतात, केव्हां पाय दिसतात; व ज्या वेळीं जें दिसतें त्याचें वर्णन दृष्टांतानें तसें करणें यांत कांहीं चूक नाहीं. तसेंच निरनिराळ्या बाजूंनीं परमेश्वराकडे पाहण्यांत कांहीं चुकीचें होणार नाहीं. हें जर तूं कबूल करशील तर तीन पोरांची तरुण विधवा आई दृष्टीस पडतांच तुझा परमेश्वर क्रूर आहे असें मी म्हटलें तर तुला खपेल का? परमेश्वर दयाळु आहे असेंच तुम्ही नेहमीं सांगत असतां. परमेश्वर जर क्रूर आहे तर त्याची भक्ति तरी कां करा!

मि०:—सुखानें अथवा आपखुषीनें तुम्हीं त्याला कबूल राहिलेंच पाहिजे, कारण तुम्हीं सर्व त्याच्या सत्तेखालीं नांदत आहांत! सर्व बाजूंनीं तुम्हीं पूर्ण जख-

झाले आहेत, व मला नास्तिकाला सुद्धां मी अमुक गोष्ट खचितपणें करीनच असें म्हणतां येणें शक्य नाहीं ! परमेश्वराच्या इच्छेशिवाय झाडाचें पानही हालत नाहीं. दोन महिन्यापूर्वींच तुझी बायको मेली तेव्हां पुण्याचे स्वदेशी विदेशी डाक्टर आणवून एक हजार रुपये चार दिवसांत तूं खर्च केलेस, पण तुम्हांला तिचें आयुष्य पळभर तरी वाढवितां आलें कां ! सर्व प्राणी सर्वथा पराधीन आहेत व सर्वांना ज्याच्या नियामक शक्तीपुढें वाकावें लागतें त्यालाच आम्हीं परमेश्वर म्हणतों !

मित्रः—पण परमेश्वराला दयाळू कां म्हणायचें तें सांग, तो क्रूर नाहीं कां !

मी—बाबारे ! हा विषय इतका जिव्हाळ्याचा आहे की त्यावर चर्चा करायलाही माझें मन घेत नाहीं. सर्व जीवांना स्वप्रेरणेनेंच परमेश्वर दयाळु आहे असें वाटलें पाहिजे. आपल्या आईविषयीं मुलाला जसें सहजप्रेम वाटतें तसें ईश्वराविषयीं वाटलें पाहिजे. परमेश्वराविषयीं शंका घेणें हें महत्पाप आहे. अरे ! दुष्ट खोडी सोडण्याकरितां आईही मुलाला मारते, म्हणून ती क्रूर होते काय ! फांशी देणें फार वाईट आहे, पण जगत्पीडा करणाऱ्या कंसासारख्या दुष्टांना फांशी देणें, ठार मारणें, खून करणें हें क्रूरपणाचें होईल काय ! अफजूलखानाला मारण्यानें शिवाजी क्रूर ठरतो काय ! ठग्या रामोशाला फांशी देणें आपाततः क्रूरपणाचें दिसतें पण त्यानें आपल्या बायकोपोरांचा खून केला होता हें आपणांस कळलें म्हणजे समाधान वाटत नाहीं कां ! हें कां वाटतें बरें ! क्रूरपणाच्या पोटांत दयाळुपणा असतो. जगाच्या कल्याणासाठीं कंसाला, रावणाला, हिरण्यकशिपूला, अफजूलखानाला, व ठग्याला मारणें हें परमदयाळूपणाचेंच कृत्य होय !

मित्रः—इतरांच्या दृष्टीनें कंसाला मारणें दयाळूपणाचें होईल, पण कंसाशीं हा परमेश्वराचा क्रूरपणाच नव्हे काय !

मित्रः—त्याच्या स्वतःच्यासाठींच कंसाला मारणें ही लीला भगवंतच मानतात ! पंत केकावलींत म्हणतात:—

असंख्य खळ संगरीं निजकरीं तुवां मारिले,
न निष्ठुरपणें– कृपा करुनि ते भवीं तारिले ।
जज्जगनक तूं, मुलें सकळ जीव–या भातुकें,
दटावुनिहि देसि बा ! अमृत नेदिजे घातुकें ९०

भगवंत दटावुनिहि भातुकें म्हणजे खाऊचा पुडा हातावर ठेवीत असतात. या भगवंताच्या दटावण्याला क्रूरपणा म्हणणें हें विपर्यस्तबुद्धीचें लक्षण आहे. बाप बाह्यात्कारीं मुलाला भय दाखवून त्याच्या हातावर खाऊ ठेवितो, त्याप्रमाणें परमकारुणिक परमेश्वरही आपणावर जीं संकटें आणतो, तीं आपल्या कल्याणार्थच आणीत असतो. आमच्या स्थूलदृष्टीला विनाश छळ, संकटें, आपत्ति, क्लेश, पराभव, दारिद्र्य, दुष्काळ, मृत्यु हे सर्व प्रकार भगवंताच्या अवकृपेमुळें होतात असें वाटतें; पण बाह्यतः अनिष्ट वाटणारीं अरिष्टें आमच्या आध्यात्मिक उन्नत्यर्थच देव आम्हांवर आणीत असतो ! कोणाचाही घातपात करण्याची इच्छा परमेश्वराच्या ठिकाणीं नाहीं. त्याची दृष्टि सर्वांवर सारखी असते. दैत्य व देव आपापल्या वासनेचीं व कर्मांचीं फळें भोगतात. विपर्यस्तबुद्धीनें भगवंताच्या कर्मांकडे पाहणारे लोक हेच दैत्य होत व परमेश्वराच्या इच्छेप्रमाणें आपल्या इच्छेचा ओघ वळवणारे पुरुषच देव होत. देव किंवा भक्त यांना स्वतंत्र इच्छाच नसते. भगवंताची इच्छा हीच त्यांची इच्छा असते.

**मित्र**:—भगवंत दुष्टांचा नाश करितो, पण हिरण्यकशिपुसारख्या स्वमता-नुसार स्वपुत्रास शिक्षण देणाऱ्या वीरास त्यानें मारलें हें माझ्या मतें बरें केलें नाहीं.

**मी**:—हिरण्यकशिपूची बुद्धि फार विपरीत झाली होती, म्हणून त्याला मोठा हटका द्यावा लागला. रोग जितका प्रबळ, तितकें औषध तीव्र असावें,

साधा कांटा घुसलेंच निघतो, मोठ्या जखमेवर जरा जालीम उपाय करावा लागतो व रोग दुःसाध्य वाटल्यास पायही तोडून काढावा लागतो ! पण दुःसाध्य रोग्याचा पाय तोडून काढणारा डाक्टर जसा क्रूर नसतो, त्याप्रमाणें महदापत्ति आणणारा व तिच्या द्वारें तुमच्या डोळ्यांत अंजन घालून तुह्माला जागृत करणारा परमेश्वरही क्रूर नाहीं ! तुह्मी आपली बुद्धि परमेश्वरविन्मुख करून उफराट्या दृष्टीनें त्याच्या कृतीकडे पाहत जाऊं नका.

**मित्रः**—हिरण्यकशिपुला मारण्यांत क्रूरपणा कसा नाहीं ?

**मीः**—हें उदाहरण तर तुझ्या सारें गळ्यांत पडणार आहे. बहिर्मुखांच्या दृष्टीला हिरण्यकशिपूचा वध हा त्याचा नाश आहे असें वाटतें. पण ही मोठी चूक आहे. प्रल्हादासारखा परमभक्त ज्याच्या पोटीं भगवंतानें घातला त्याचा नाश करावें त्याच्या मनांत होतें काय ? महाभागवत ज्याच्या वीर्यापासून उत्पन्न झाला त्याचें अंतःकरण काय खरोखरच भगवद्द्वेषानें लिडबिडलें होतें ? दुसरें प्रमाण असें कीं, मरणसमयीं चुकून देवाचें नाव तोंडून निघालें तरी जीवाला सद्गति मिळते, मग साक्षात भगवंताच्या मांडीवर, भगवंताच्या हातांनीं, भगवंताचें मुखकमल डोळ्यांपुढें असतांना व सर्वेंद्रियें भगवद्रूप झालीं असतांना ज्या हिरण्यकशिपूला मरण आलें त्याचें मरण ह्मणजे काय त्याचा नाश होय ? तुह्मां अर्धवट नास्तिकांना मृत्यूचा मोठा बाऊ वाटतो व मृत्यु ही आपत्ति आहे असें वाटतें, पण ही तुमची चूक होय. हिरण्यकशिपूचा मृत्यु हा त्याचा नाश नव्हे, ही त्याची सद्गति आहे !

**मित्रः**—हिरण्यकशिपु देवाचा द्वेष तरी करीत असे, पण बळीसारख्या निस्सीम भक्ताचा छळ भगवंतांनीं कां केला हें तूं सांगूं शकशील ?

**मीः**—अरे हो ! त्यांत काय गूढ आहे ? आधीं तुम्ही स्थूलबुद्धीचे लोक ज्याला छळ ह्मणतां तो छळ नसून अनुग्रह आहे ! हा सर्व प्रसिद्ध दुःखदायक असल्यामुळें व वारंवार मनाला मोहांत पाडून अधोगतीला नेणारा

असल्यामुळें भक्तकल्याणार्थ भक्ताला प्रथम निष्परिग्रह करणें म्हणजे भक्ताचें सर्वस्व हरण करणें भगवंताला भाग पडतें! बळीचें सर्वस्व हरण करण्यांत भगवंताचा हेतु त्यांच्याच मुखानें मी सांगतोंः—

करितों अनुग्रह मनांतूनि जयावरि दयाभ्र मी हरि तों।
त्याच्या सर्वार्थांतें, न पडों घाया तया भ्रमीं, हरितों!! ॥ १ ॥

मी दयाभ्र म्हणजे दयेचा मेघ आहे. ज्याच्यावर मी मनांतून अनुग्रह करितों, त्याचें मी–माझें या भ्रमांत त्यानें पडूं नये म्हणून, मी सर्वस्व हरण करितों!' द्रव्याचा मद अनावर आहे, ऐश्वर्याचा उन्माद कठिण आहे, म्हणून त्याला निष्कांचन करून ठेवतो.

अर्थीहीं मद होतां होय पुरुष बहु अनम्र बा! धात्या!।
अवमानितो जनातें मातें ही! ती पिशाचबाधा त्या ॥ २ ॥

'आढ्योऽभिजनवानस्मि कोन्योस्ति सदृशो मया' इत्यादि प्रकारांनी मनुष्य उन्मत्त होतो, म्हणून आसुरी वृत्ति बनविणारी त्याची आसुरी संपत्ति मी हरण करून घेतों. विपत्ति, दारिद्र्य, क्लेश, संकटें ही भगवंताची अवकृपा म्हणून लोक समजतात, पण ही अवकृपा नसून हे कांहीं विशेष प्रकाराचे उपदेशप्रसंग आहेत. भगवंत आपल्याला हे धडे देत असतात, व हे जर आपण शिकलो नाहींत तर तो दोष आपला आहे.

**मित्रः**—विपत्तीला भगवंताचा अनुग्रह समजण्याइतके वेडे कोण आहेत?

**मीः**—हें पहा, हें जग असें उफराटें चाललें आहे कीं लोक शहाण्याला वेडा व वेड्याला शहाणा समजतात। पण जगाच्या दृष्टीचें वेडे लोक विपत्तीला भगवदनुग्रहच समजतात. कौरवांचा नाश होऊन धर्मराज सिंहासनाधीश्वर झाले तेव्हां कुंतीनें देवापाशींः—

विपदः सन्तु नः शश्वद् यासु संकीर्त्यते हरिः ॥ १ ॥

म्हणजे ज्या विपत्तींत हरीचें अखंड स्मरण होतें ती विपत्ति आमच्यावर निरंतर असो, असाच वर मागितला !

[१] देव भक्तालागीं करूं नेदी संसार । अंगें वारावार करूनि ठेवी।

... ... ... ... ... ... ...

[२] बाइल मेली मुक्त झाली । देवें माया सोडविली ॥ १ ॥
विठो ! तुझें माझें राज्य । नाहीं दुसऱ्याचें काज ॥ १ ॥

[३] बरें झालें देवा दिवाळें निघालें । बरीं या दुष्काळें पीडा केली ॥

... ... ... ... ... ... ...

या तीन अभंगांत तुकाराममहाराजांनीं तेंच मागितलें आहे. संपत्ती अथवा विपत्ति, सुख अगर दुःख, जन्म अगर मृत्यु हीं द्वंद्वें देव आपल्या हितामाठींच आपणावर आणतात. हे धडे आहेत. प्रत्येक प्रसंग म्हणजे एक नवा धडा आहे, पण मद्द मुलांप्रमाणें बहुतेक लोक तो विसरून जातात. हुशार विद्यार्थ्याला गुरु पारितोषक देतात, व द्वड अगर कुचर मुलाला बाकावर उभे करितात. वाटेल ती शिक्षा देतात. दोन्ही विद्यार्थ्यांबद्दल गुरूला सारखीच कळकळ असते. पारितोषक अगर शिक्षा गुरु कल्याणार्थच देत असतो, तसाच परमात्मा सुख अगर दुःख दोन्हीं प्राक्कर्म पाहून आपल्याला देत असतो. नरहरीचा अवतार हिरण्यकशिपूला शिक्षा करण्याकरितां व प्रल्हादाला बक्षीस देण्याकरितां झाला. दोघेही जीव परमेश्वराचीं लेंकरेंच होत. एक द्वड व एक आज्ञाधारक. "जगज्जनक तूं, मुलें जीव" हेंच नातें खरें आहे. भगवंताची दया हीच आपली खरी जननी होय, व जननी ही तिनें नेमलेली दाई होय. पंत म्हणतातः—

कृपाचि जननी तुझी, सकल जीव दायाद, या ।

तिणेंचि उपदेशिल्या करिति सर्व दाया दया !

-केकावलि ९७

ज्या बळीचा छळ केल्याबद्दल आपण उहापोह करीत आहांत, त्याबद्दल पंत केकावलींत काय म्हणतात तें पहा.--

तुम्हींहि बळि बांधिला, म्हणुनि आमुची माय जी
मनांत सहजा दया, निपट टाकिली काय जी ! ।
सकोप दिसती गुरु, क्षणभरीच, जें तापलें
जल ज्वलनसंगमें त्यजि न शैत्य तें आपुलें ॥

—केकावली ८८

**मित्रः**—गड्या ! तूं आज माझ्या विचाराचा ओघ थोडाला फिरवूं पहात आहेस.

---

## ( लेखांक ३. )

परमेश्वराच्या दयाशीलतेबद्दल माझ्या मित्राला मी ज्या दोन गोष्टी सांगितल्या त्यांचा त्याच्या मनावर बराच परिणाम झालासें दिसल्यावरून त्याच विषयाचें आणखी एकदां उद्घाटण करावें असें मला वाटलें. भगवंताच्या दयाळुत्वासारखी जी गोष्ट मनुष्याला गृहीतकृत्यामारखी स्वयंसिद्ध वाटावी ती विपरीत काळाच्या प्रतापामुळें सिद्ध करुन दाखविण्याचा तुर्त प्रसंग आला आहे ! असो. हिरण्यकशिपूचा वध किंवा बळीचा छळ करण्यांत परमेश्वराचा हेतु जनतेचें कल्याण करण्याचा होता, एवढेंच नव्हे तर त्यांचेंही कल्याण करण्याचाच होता व याप्रत: क्रूरपणाच्या वाटणाऱ्या गोष्टींत सुद्धां परमेश्वराची दयाशीलताच प्रकट असते हें मागील प्रसंगीं दाखविलेंच होतें. विनाश,

संकटें, आपत्ति, क्लेश, पराभव, दारिद्र्य, दुष्काळ, मृत्यु इत्यादि अरिष्टें आप णांवर येऊन आदळलीं तरी तीं आणण्यांत आपला उद्धार व्हावा असेंच परमे श्वराच्या मनांत असतें, हें तत्व व्यक्त करून दाखविल्यानंतर मी ह्मणालों:—

हिरण्यकशिपु व बळी यांचीं उदाहरणें मी दिलींच आहेत, आणखी एक अहल्येचें उदाहरण देतों. अहल्येला गौतमानें ' जडशिळा होऊन पड ' असा शाप दिला. हा शाप वस्तुतः परमेशाचा कोप होय असें स्थूलदृष्टीचा मनुष्य ह्मणेल. पण या शापामुळेंच तिला राघवाचे पाय लागून ती पुढें मुक्त झाली इकडे अनुसंधान ठेवलें ह्मणजे रामदर्शनानंदानें उन्मत्त होऊन ती जसें ह्मणाली कीः—

शाप न अनुग्रहचि हा. ह्मणुनिच तुज बा ! महायशा पाहें ।

असेंच प्रत्येक सद्भक्तास वाटल्याशिवाय राहणार नाहीं. सच्छील व प्रेमी मनुष्याचें मन सहसा विरून होत नाहीं. तो दुसऱ्याला दोष देण्यापूर्वी आप-ल्याच ठिकाणीं दोष पाहूं लागतो. आपल्या मनासारखें झालें नाही की परमे-श्वरावर रागावणारे वेडेपीर जगांत पुष्कळ आहेत ! पण समर्थ ह्मणतात—

आपुलिया मनोगताकारणें । देवावरी क्रोधास येणें ।
ऐसीं नव्हेत कीं लक्षणें । सगुणभक्तीचीं ॥ २१ ॥
देवाचें जें उचित । तेंचि आपुलें मनोगत ।
इच्छेसाठीं भगवंत । अंतरूं नये कीं ॥ २२ ॥

—दासबोध द. ४ स. ८

**मित्रः**—या ओंवांचें स्पष्टीकरण पाहिजे.

**मीः**—आपल्या मनोगताप्रमाणें देवाला वाकवूं पाहण्याची इच्छा करणारा मनुष्य खरा भक्त नव्हे. भक्त तोच कीं जो देवाची जी इच्छा तीच आपली इच्छा, देवाचें जें मनोगत तेंच आपलें मनोगत, देवाचा जो मार्ग तोच

आपल्या उद्धाराचा निश्चित मार्ग असें निरंतर भावून कसल्याही प्रसंगीं देवाविषयीची आपली श्रद्धा लवमात्रही ढासळूं देत नाहीं ! अनुकूलत्व हें जसें पतिव्रतेचें परम लक्षण आहे तसेंच भक्ताचेंही आहे.

पतिव्रते जैसा भ्रतार प्रमाण । आह्मां नारायण तैशापरी ॥ १ ॥

पतिव्रतेला भ्रताराच्या इच्छेशिवाय दुसरी स्वतंत्र इच्छा नसते, त्याप्रमाणेंच भक्तालाही भगवदिच्छेवांचून दुसरा कायदा माहीत नसतो. भगवंत हेंच भक्ताचें मुख्य प्रमाण होय, ह्मणून भक्त आपल्या इच्छेसाठीं देवावर क्रोधास येत नाहीं.

**मित्र**—पण भक्तानें असा आंधळेपणानें देवावर सारा भार काय म्हणून टाकावा ?

**मी**ः—देवाशिवाय दुसरा कोणीही आपणांस संकटीं तारावयाला समर्थ नाहीं व देव भक्ताचा प्रतिपाळ करितो असा सर्व देशांतल्या सर्व काळच्या संतांचा अनुभव आहे ह्मणून !

**मित्र**!—ही असली आंधळी भक्ति [ Blind Faith ] आपणास नको बाबा ! विश्वासला [ Reasoning ला ] टिकणारी भक्ति पाहिजे.

**मी**—आंधळी भक्ति आणि डोळस भक्ति हा मोठा भेद तुम्हीं अर्वाचीनांनीं काढला आहे ज्ञानदेव, तुकाराम, एकनाथ, रामदास, इत्यादि भक्त आंधळे होते कां डोळस होते !

**मित्र**!—ते डोळस होते असें कबूल केलेंच पाहिजे !

**मी**ः—तर मग त्यांच्या अनुभवाच्या उक्तीवर विश्वासही ठेवलाच पाहिजे ! तुकोबांनी आपल्या आत्मचरित्रांत संतांनाः—

भक्तां नारायण नुपेक्षी सर्वथा । कृपावंत ऐसें कळों आलें॥ १

असा आपला खास अनुभव स्पष्ट सांगितला आहे, तुला पाहिजे असेल तर ' देव दयाळु आहे, तो भक्ताचा सर्व प्रकारें प्रतिपाळ करितो, व याचा मला ही जा-

तांनें अनुभव आहे ' अशा संतांच्या एक हजार उक्ति त्यांच्या ग्रंथांत सहज सांपडतील.

**मित्रः**— भक्त अल्लडपणानें देवावर सर्वभार टाकीत असतील, पण देवाला भक्तांची उलट काळजी आहेच याला प्रमाण काय ?

**मीः**—अरे ! तू श्रीभगवद्गीता पाहिली आहेस काय ?

> तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् ।
> भवामि न चिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम् अ. १२–७
> तेषामेवानुकंपार्थमहमज्ञानजं तमः ।
> नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता ॥ अ. १० ११

इत्यादि शेकडो ठिकाणीं भगवंतांनीं मोठ्या प्रेमानें अभिवचनें दिलीं आहेत. भक्त आणि भगवंत यांचा अन्योन्यप्रेमा अनिवार असतो.

**मित्रः** —भक्त व देव यांचा अन्योन्यप्रेमा विलक्षण असेल, पण त्याचा आपल्या सारख्यांना काय उपयोग ?

**मीः** —अरे ! उपयोग काय म्हणून काय विचारतोस ' भक्तांची निराळी खाण कां आहे ? ज्या खाणींतून भक्त जन्मास आले त्याच खाणींत आपणही जन्मास आलो आहोंत. 'जो नर करणी करील तो नारायण होईल' असें साधुवचन आहे ना ? आपणच आपला विचार घेऊं लागावें. आपल्या वृत्तीचा माग घेऊं लागावें, चित्तशुद्धीचा प्रकार नित्य पहात असावा, संत ज्या मार्गानें गेले तो मार्ग न्याहाळीत असावें म्हणजे नको म्हणतांही संतपण अंगीं येऊन जडेल ! शाश्वत काय, अशाश्वत काय, याचा निवाडा करूं लागावें व शाश्वत तेंचि घ्यावें म्हणजे साधुपण कांहीं निराळें नाहीं ' उमेद पाहिजे, उत्साह पाहिजे, संतपणाची आवड व तो मिळविण्याचा अभ्यास पाहिजे. म्हणजे सर्व कांहीं जवळ आहे. बद्धाचा मुमुक्षु, मुमुक्षूचा साधक व साधकाचा पूर्ण सिद्ध होण्यास कांहीं युगें कां जावीं लागतात ? 'कल्पनेनें प्राप्त झालेलें जीवत्व संकल्प-

लोपींच मावळतें ' असें ज्ञानोबारायांनीं स्पष्ट म्हटलें आहे. आपणावर कोसळलेलीं संकटें किंवा येणाऱ्या आपत्ति अधिकारानुरूप पुण्यवंत व जाणता जीव स्वोद्धारार्थ आल्या आहेत असें समजून परमेश्वरावरचें प्रेम व निष्ठा अभंग ठेवतो हा आपला मुख्य मुद्दा आहे तो तुझ्या लक्षांत असेलच.

**मित्रः**—मीं तुला एका विधवेचें उदाहरण देऊन विचारलें होतें कीं त्या अनाथ गरीब सुशील गाईचा एकुलता एक मुलगा हरण करण्यांत ईश्वराकडे निर्घृणतादोष येत नाहीं कां !

**मीः**—ईश्वर कोणाला जन्म देत नाहीं व कोणाला हरणही करीत नाहीं. जीव मात्र आपापल्या कर्मानुसार सुखदुःखें भोगीत असतात.

**मित्रः**—बरी आठवण झाली. तुझा मुलगा सीताराम पंधरा दिवसापूर्वी वारला तेव्हां तुला काय वाटलें !

**मीः**—मला क्षणभर दुःख झालें हें मी कबूल करितों. पण दुःख होणें हें केवळ अज्ञानाचें फळ आहे हा विचार माझ्या मनांत सतत जागृत असल्यामुळें त्या दुःखाचा उमाळा फार लवकर ओसरला. मी आपल्या मनाशीं असा विचार केला:—" अल्पकालच्या संगतीमुळें ह्या मुलावर माझें जें प्रेम जडलें त्यापेक्षा परमेश्वरावर माझें प्रेम जास्त असतें तर माझ्या हृदयांत दुःखाची ऊर्मीही उद्भवली नसती ! उलट परमेश्वरानें माझ्या वाटेतला एक कांटा दूर केला याबद्दल मला आनंदच झाला असता. " स्थिरधीस्तु तदेवमन्यते कुशलद्वारतया समुद्धृतम् " या प्रकारची किंवा ' विठो तुझें माझें राज्य । नाहीं दुसऱ्याचें काज " या प्रकारची स्थिरप्रज्ञता माझ्या ठिकाणीं अद्याप उत्पन्न झालेली नाहीं ! माझीं व्याख्यानें, पुराणें, ग्रंथकर्तृत्व, व वाचन यांहीं करून मी ज्या ज्ञानाच्या गोष्टी जगाला सांगतों, त्यांचा माझ्या स्वतःच्या मनावर किती थोडा परिणाम झाला आहे हें मात्र माझ्या मनावर यामुळें ज्यास्त बिंबत आहे ! पुत्रमोहाच्या अंधकारांत मी चांचपडत रहावें हें परमेश्वराला न आवडून त्यानें माझ्या मुलाला मजपासून दूर केलें हा त्या दयाघनाचा मी उपकारच समजतो, शिवाय त्या जी-

वाला ' माझा पुत्र ' ह्मणण्याचा तरी मला कां अभिमान असावा ! परमेश्वराचा मुलगा, परमेश्वरानें नेला. जसा मी देवाचा, तसा सीतारामही देवाचा. देवानेंच त्याला जन्मास घातलें व देवानेंच त्याला दूर केलें. जें आपलें नाहीं त्याला आपण आपलें ह्मणून म्हणतो व जें आपलें आहे त्याला ओळखण्याची तळमळही करीत नाहीं हेंच अज्ञान होय.

पै आपुलें जें साचें । तें कल्पांतींही न वचे
हें जाणोनि गताचे । न शोची जो ॥१॥

ही ज्ञानेश्वरांची उक्ति अयथार्थ नाहीं. पुत्र गेल्यामुळें मला अज्ञानात्मव किंचित्काळ वाईट वाटलें खरें; पण मुलगा, स्त्री, कन्या, द्रव्य कीर्ति, स्थावर-जंगम इत्यादिकांविषयीं तेव्हांपासून मला अनासक्ति वाटूं लागली, ' एक देव आहे खरा । माया नाथिला पसारा ' हें समर्थवचन साच वाटूं लागलें व ' मिथ्या हे अनेक रे । सत्य राम एक रे ' ही साधूक्ति मनावर बिंबूं लागली. परमेश्वरावर शुद्ध, निष्कपट, व अखंड प्रेम ठेवलें म्हणून वियोगाचें भय नाहीं; पण जर तें इतर वस्तूंवर किंवा प्राण्यावर ठेवलें तर वियोगाचें भय संयोगकालींही वाघुलासारखें भविष्यिन्याशिवाय राहत नाहीं ! मित्रा ! काय सांगूं ? ह्या विचारामुळें माझ्या मनाची तळमळ शमली व उलट जीवाला अत्यंत सुख वाटूं लागलें ! !

**मित्रः**—लहान, निर्मळ, कोमळ मुलें व प्राणाहून प्रेम करणारी स्त्री यांना शत्रूसारखे मानणें व हीं आपल्या उद्धाराच्या मार्गांतलीं विघ्नें आहेत असें समजणें हें सर्वथा गैरच नव्हे तर अत्यंत पापमूलक आहे असें मला वाटतें ! अरे ! मोरोपंतांच्या चरित्रांतल्या ' गृहस्थाश्रम ' ह्या प्रकरणांतलीं गोड व प्रेमळ पदें मला वाचून दाखवून तूंच ना परवां मिटक्या मारीत होतास ?

बाळ मुखींचीं जरि अव्यक्तें अक्षररूपें साधीं ।
केवळ अमृतचि होतीं वत्सलगुरुजनकर्णीं आधीं ॥ १ ॥

ही साकी तर माझ्या कानांत अजून गुणगुणत आहे !

**मीः**—असें नव्हे रे ! मला कोमल मूल आणि फूल मनापासून आवडतें, व त्याच्याठायीं देवपणाही जास्त आहे असेंही वाटतें. स्त्रीपुत्रांना आपण द्वेष्य समजावें असें माझें म्हणणें नाहीं. सर्वशक्तिमान्, सर्वज्ञ, सर्वव्यापी, सर्वभूताधिवास व परमदयाळू परमात्म्याविषयीं आपल्या मनांत परिपूर्ण प्रेम असल्यास स्त्रीपुत्रादि विघ्नरूप नाहींत, पण नारायणप्रेमाला जर हीं अंतराय करीत असतील किंवा परमेश्वरप्रेमाचें स्थान हीं पटकावीत असतील तर हीं विघ्नरूप आहेत असेंच मानलें पाहिजे ! परमेश्वर हा आपल्या पूर्णप्रेमाचा खरा विषय असल्यावर स्त्रीपुत्रांवर आत्मबुद्धीनें प्रेम ठेवणें गैर नाहीं. देहबुद्धीनें स्त्रीपुत्रादिकांवर प्रेम करशील तर मग मात्र गोतें खाशील. आधीं परमेश्वरावर प्रेम ठेव व त्याचीं म्हणून स्त्रीपुत्रांवर प्रेम ठेव. नीट उलगडून पहा. मन उगाच घोंटाळ्यांत पाडूं नकोस. एखाद्या श्रीमंत मनुष्यानें आपल्या मुलाच्या संगोपनार्थ ठेवलेली दाई ज्याप्रमाणें आपल्या यजमानाच्या मुलावर प्रेम करते, त्याला न्हाऊंमाखूं घालते, त्याला कुरवाळून त्याचे प्रेमावेशांत मुके घेते, गाणीं गाऊन त्याला थोपटून निजविते व हर प्रकारें त्याला लाडिवाळपणानें वाढविते, पण हें मूल माझें नसून माझ्या यजमानणीचें आहे अशी जशी जागृत रहाते, त्याप्रमाणें संसारांत आपल्या संगतीला आलेला स्त्रीपुत्रादि परिवार आपला नसून परमेश्वराचा आहे ही जागृति ठेवून जर आपण त्यांजवर प्रेम केलें तर मग मात्र संसारबंधनाचें भय नाहीं. हाच भाव मनांत आणून पंतांनीं केकावलींत:—

कृपाचि जननी तुझी सकल जीव दायाद या
तिणेंचि उपदेशिल्या करिति सर्व दाया दया ॥
असें उमजतां भले न गुरुभाव तो टाकिती
सुता तुजहि गोपिका मग जनास तोटा किती ? ॥ ९७ ॥

असें देवाला म्हटलें आहे.

---

# १३ प्रयत्न व प्रारब्ध.

१ सदरहू प्रश्न फार मजेचा पण महत्वाचा आहे. सर्व कार्यकर्त्या पुरुषांनीं प्रयत्नवादाचा आश्रय करून आपलें व आपल्या राष्ट्राचें नशीब काढलें आहे. दैववाद व प्रयत्नवाद हे पक्ष फार पुरातन आहेत ! गीतेनें प्रयत्नवादाचा अंगिकार केला आहे, व दासबोधही प्रयत्नवादीच आहे. वेदांतशास्त्रानें ' कर्मवादाचा ' आश्रय करून प्रयत्नवादाचाच पुरस्कार केला आहे. मी करीन तें होईल अशी उमेद धरून कार्य करावें हें योग्य आहे, मात्र प्रयत्नाप्रमाणें नेहमी येथं व या लोकींच फळ मिळतेंच असें नाहीं. आमच्या मतानें ' कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ' या गीतावचनानें उभयपक्षांचा समेट केला आहे ! दैववादही खोटा नाहीं ! पूर्वकर्मांचा समुच्चय ह्मणजेच दैव होय. आज आह्मी ज्याला दैव ह्मणतो तें पूर्वकर्मांचेच एकीकृत फळ होय. कर्मवाद अथवा प्रयत्नवाद हाच खरा धर्म चालण्यांत ऐहिक व पारत्रिक उन्नतीचा मार्ग सांपडणार आहे. कर्तृत्वहीन, आळशी व लबाड लोक पुष्कळदां दैववादाच्या व ग्रहांच्या आड दडून आपल्या आळसाचें मंडण करीत असतात ! ' ईश्वर, काळ आणि कर्म ' हे तीन सुखदुःख देणारे आहेत असें मुक्तेश्वरानें आपल्या भारतांत ह्मटलें आहे. तीनही मिळून ईश्वरच आहे, ह्मणून भीष्माचार्यांनीं पांडवांस सांगितल्याप्रमाणें:--

**आर्या**

तस्मात् सुखदुःखादिक हें सर्वहि होय ईश्वराधीन ।<br>
जाणुनि असा करावा निश्चय कीं तत्प्रसाद स्वाधीन ॥ १ ॥<br>
व्हावें अनुवर्ती या प्रभुचें याचि प्रभूत्तमा गावें<br>
स्वामी ! प्रभुजी ! पाळा प्रजा अनाथा " असेंचि मागावें ॥ १ ॥

—मोरोपंत

२ ईश्वरावर विश्वास ठेवून 'भाग आला तो व्यवसाय करीत असावें. प्रयत्नवादच खरा असा आग्रह धरण्यांतही अर्थ नाहीं. हरिश्चंद्र, नळ, व पांडव यांनाही काळानें रडविलें आहे! मनुष्याला ऐश्वर्यकाळीं प्रयत्नवाद आठवतो, व आपत्तिकाळीं दैववाद आठवतो! यशाच्या काळीं मनुष्य अहंभावानें फुगून प्रयत्नवादाचें प्रतिपादन करितो, व अपयशाच्या काळीं खचून जाऊन दैववादी बनतो! प्रयत्नवाद व दैववाद या दोन्ही वादांची एकवाक्यता करणारा कर्मवाद मात्र खरा आहे! पृथ्वी दिवसा प्रकाशित दिसते, व रात्रीं अंधकारमय दिसतें पण प्रकाश व अंधकार हे दोन्ही पृथ्वीचे धर्म नाहींत; त्याप्रमाणें सर्वच विश्व हें त्या निरंजन परमात्म्याचा चिद्विलास आहे, सारे विश्वव्यापार हे त्याचे सहज खेळ आहेत, त्याच्या ठिकाणीं दोन्ही वादांचा लेप नाहीं! वादांची उत्पत्ति मायाजन्य अहंभावापासून आहे व त्याचा लयही त्या अहंभावाच्या लयाबरोबरच होणार आहे! ईश्वर होऊन ईश्वरधर्म जाणावे व तदनुसार वागावे. स्व-भाव जाणून स्व-धर्म अनुसरावे. ईश्वर विश्वव्यापार चालवीत आहे, व आपणही त्या चक्राला स्वधर्मानुष्ठानानें गति द्यावी. इंद्रियव्यापार खुंटत नाहींत तेथपर्यंत तरी आपलें आपल्या समाजाबद्दलचें कर्तव्य केलेंच पाहिजे. ज्ञानेश्वरमहाराज सांगतात त्याप्रमाणें:--

ह्मणोनी जें जें उचित। आणि अवसरेंकरूनि प्राप्त।
तें कर्म हेतुरहित। आचरें तूं।॥ १ ॥
अहंकारातें दवडूनी। सकळ काम सांडूनी।
विचरें विश्व होऊनी। विश्वामाजी ॥२ ॥

३ दैव बलवत्तर आहे हा सर्वांचा अनुभव आहेच. दैवापुढें पौरुषालाही पुष्कळदां हात टेंकावे लागतात! तथापि अलौकिक पुण्यबलानें दैवाच्याही मुसक्या बांधतां येतात. सावित्रीच्या कपाळीं वैधव्य लिहिलें होतें, तिचा पति अल्पवयांतच मरणार होता, पण तिनें आपल्या अनुपम पातिव्रत्यतेजानें दैवालाही

मागें हटविलें. नवग्रह बलवत्तर आहेत. यांत तिळमात्र शंका नाहीं, पण नवग्रहाचा राजा जो परमेश्वर त्याला स्वधर्मानुष्ठानानें व भक्तीनें वश करणाऱ्या कर्मयोगी भक्तापुढें तेही दुबळे होऊन पडतात ! भक्तिमार्गाचें उत्तमत्व याप्रमाणें प्रस्थापित होतें. मूळ पकडणाराला शाखापल्लवांची काळजी नको. राजाचें मन स्वाधीन ठेवणारा मनुष्य चोपदारांची पर्वा बाळगीत नाहीं. ' भूतभविष्य वर्तमान सांगू जाणारे आह्मांला डोळ्यांसमोरही नकोत ' असें तुकाराम महाराज ह्मणतात तें भक्तांना खोटें नाहीं. पण राजाची ओळख नसणारांनीं चोपदारांचे हात दाबून आपलीं कार्यकार्यें करवून घेणें हेंही व्यवहाराला सोडून नाहीं. वेदांत, ज्योतिष, व भक्तिमार्ग यांचा मुळांत विरोध नाहीं. भिन्न भिन्न शास्त्रांत अज्ञ व अभिमानी लोक निष्कारण विरोध माजवितात, पण सर्व शास्त्रें अविरोधानें पाहिलीं ह्मणजे सर्वांचा मथितार्थ एकच आहे असें आढळून येतें. मनुष्यानें पुण्यसंचय करीत असावा, ह्मणजे ग्रह अनुकूल असले तर शीघ्र इष्टप्राप्ती होईल; ते प्रतिकूल असले तर त्यांची प्रतिकूलता कमी होईल. पुण्यकर्में करावीत, वादांत आयुष्य न वेंचतां निर्णयाशीं गांठ ठेवावी, व सत्प्रयत्न करावेत. प्रयत्नवादी होऊनही भागत नाहींच. तथापि प्रयत्न करायला पाहिजेत. शुद्ध, भावानें सत्प्रयत्नांची काळवेळ पाहून झोड उडवावी ह्मणजे सावित्रीप्रमाणें।—

अत्युत्कटैः पुण्यपापैरिहैव फलमश्नुते ।

या न्यायानें ग्रहांशीं व ज्योतिषाशीं न भांडतां प्रयत्नवादच खरा आहे असें आपाप सिद्ध होईल !

